**विशेष समाचार**

# पोलंडमधे नवीन सरकार

**आ**ता पोलंडमधे पुन्हा नवीन सरकार बनले आहे. परन्तु हे कम्युनिस्ट सरकार नव्हे. २९ सप्टेम्बरला सार्वत्रिक निवडणुका झाल्या. या वेळी पोलंडच्या जनतेने 'सॉलिडॅरिटी' पार्टीच्या हाती अधिकारभार सोपवला. १९४५ मधे दुसरे महायुद्ध समाप्त झाले व त्यानन्तर पोलंडमधे कम्युनिस्टांनी शासन आपल्या हाती घेतले. यानन्तर जवळजवळ चाळीस वर्षे त्यांचेच शासन चालत राहिले. यानन्तर, म्हणजे आताच 'सॉलिडॅरिटी' पार्टी गादीवर आली.



१९३९ मधे जर्मनीच्या हुकुमशहा ॲडॉल्फ हिटलरने पोलंड आपल्या स्वतःच्या अधिकारात घेतले. इथूनच दुसऱ्या जागतिक महायुद्धाची सुरुवात झाली. त्यावेळी सोव्हिएट युनियन व जर्मनी देशांमधे "पारस्परिक अतिक्रमणा' संबंधी तह झालेला होता. जर्मनी व जपान यांनी मिळून 'ॲक्सिस' नावाच्या एका शक्तिशाली गटाची स्थापना केली. अमेरिका, इंग्लंड, फ्रान्स इत्यादी देशांनी 'मित्रपक्ष' नावाने आपलाही एक गट बनवला.

सहा वर्षे पर्यन्त हे जागतिक महायुद्ध चालू राहिले. जर्मनीला आपल्या विजयाचा काहीसा मर्यादेबाहेरच जास्त अभिमान होता. जुन्या तहाच्या अटी धाब्यावर बसवून ते सोव्हिएट युनियनवर तुटून पडले. यामुळे सोव्हिएट युनियननेही 'मित्रपक्षा' शी हातमिळवणी करायचा निर्णय घेतला. या निर्णयामुळे 'ॲक्सिस' च्या विजयाच्या शक्यतेत बदल घडले. सोव्हिएट युनियनने पोलंडबरोबरच इतर काही युरोपियन देशही जर्मनीच्या कचाट्यातून मुक्त केले. 'मित्रपक्षा'ची सैन्ये पश्चिमेकडून व सोव्हिएट सैन्य पूर्वेकडून जर्मनीची राजधानी बर्लिनमधे पोचले. हिटलरने आत्महत्या केली. जर्मनीचे दोन भाग बनले पश्चिम जर्मनी व पूर्व जर्मनी. बर्लिन शहराचेही दोन भाग झाले. परन्तु हे दोन्ही भाग १९९० मधे पुन्हा एकत्रित केले गेले. आता देशाला 'जर्मनी' नाव प्राप्त झाले.

पोलंडच्या मनात सोव्हिएट युनियनबद्दल आदर होता, कारण त्यांना वाटे की त्यांच्यामुळे आपल्याला स्वातन्त्र्य मिळाले आहे. पोलंडमधे कम्युनिस्ट शासनाच्या स्थापनेसाठी सोव्हिएट युनियनने त्यांना प्रोत्साहन दिले. १९४८ मधे निवडणुका झाल्या आणि कम्युनिस्टांच्या हाती सत्ता आली. तीस वर्षांनंतर 'सॉलिडॅरिटी' ट्रेड युनियनने हरताळ व झगडे करून एक आन्दोलन सुरू केले. हे हरताळ व झगडे होत राहिले तरी १९८० पर्यन्त कम्युनिस्टांना अनुकूल असणाऱ्या पक्षांनीच सत्ता संभाळली. १९८३ साल सुरू होता होता 'सॉलिडॅरिटी पार्टी' एक राजनैतिक शक्तीच्या रूपात पुढे आली. १९८९ मधे लेक वालेसाच्या नेतृत्वाखाली कम्युनिस्टेतर शासनाची स्थापना झाली. परन्तु १९९३ मधे पुन्हा कम्युनिस्टांचेच स्वागत झाले. आणि 'सॉलिडॅरिटी' पार्टी आपली सत्ता घालवून बसली. लेक वालेसाने आपल्या अध्यक्ष पदाचा राजिनामा दिला.

चार वर्षांनन्तर मरियम किजकेलेस्कीच्या नेतृत्वाखाली 'सॉलिडॅरिटी' पार्टी आश्चर्यकारक रूपाने पुन्हा शासन हाती घेण्यात सफल झाली. जर्सी बुसेक प्रधानमन्त्री म्हणून निवडून आले.





# राक्षसाचा विवाह

**पू**र्वी कोसल राज्याच्या राजधानीत भैरवशास्त्री नावाचा एक वाक्पटु रहात असे. त्याचे वाक्चातुर्य सर्वांनाच आकर्षित करून घेई. फारसा शिकू शकला नाही, तरी तो आपल्या चातुर्यपूर्ण बोलण्याने सर्वांना खूप हसवत असे. त्याचा मेहुणा राजाच्या दरबारी पंडितांपैकी एक होता. ब्रह्मचारी भैरव या मेहुण्याच्या घरीच रहात असे.

एक दिवस मेहुणा आपल्या बायकोला-भैरवच्या बहिणीला म्हणाला, ''स्वर्णचन्द्रिका ही महाराजांची एकुलती एक कन्या आहे. महाराज सध्या तिच्या विवाहाच्या प्रयत्नात आहेत. त्यांची इच्छा आहे की, वैदेहीच्या राजपुत्राला आपला जावई बनवावा. पण तुला तर माहीतच आहे की, वैदेही राज्य आपल्यापेक्षा मोठं अन् संपन्न आहे. त्यामुळे तो राजा या विवाहाला संमती देईल की नाही, याबद्दल महाराजांना शंका आहे.''

भैरवशास्त्रीची बहीण म्हणाली, ''का नाही होणार तयार? यात शंकेला काही जागाच नाहीय. आपल्या भैरवला तिथे पाठवीन मी. आपलं वाक्-चातुर्य आणि हास्यपूर्ण शब्द याचा धडाधड अुपयोग करून तो सूर्यास्तापूर्वीच त्यांना विवाहासाठी तयार करील अन् हे स्थळ पक्कं करून परत येईल पहा!''

''हो तर! शिक्षण-क्षेत्र सोडून बाकी साऱ्या क्षेत्रात तुझा भाअू समर्थ आहे!'' असे बोलून भैरवचा मेहुणा खदाखदा हसला.

भैरवशास्त्री त्यांचे हे संभाषण लक्षपूर्वक ऐकत होता. मनातल्या मनात त्याने वैदेहीला जाअून हे काम सफल करूनच यायचे ठरवले. 'या कार्यात सफल झालो, तर महाराज मला नक्कीच काहीतरी मौल्यवान भेट देतील.' असे त्याला वाटले. दुसऱ्याच दिवशी सकाळी कोणाला न सांगता तो वैदेहीला जायला निघाला. त्याच्या अंगात खूप अुत्साह भरलेला होता, अन् आपल्या ध्येयपूर्तीबद्दल मनात आशा होती. कोसल व वैदेही या राज्यांच्या मधे एक घनदाट जंगल होते. या जंगलात एक राक्षसी रहाते असे प्रजेला कायम भय वाटत असे. त्यामुळे लोक या जंगलातून न जाता दुसऱ्या एका जरा लांबच्या पण लहानशा जंगलातून जात असत. सरोवराजवळ पोचला, पाणी पिअून त्याने तहान भागवली. अतिशय थकल्यामुळे एका झाडाखाली तो विश्रांती घेत बसला. हळूहळू निद्रादेवीने त्याच्यावर कृपा केली.



त्याच वेळी एक म्हातारी राक्षसी तेथे आली. तिच्या पावलांच्या आवाजाने जमीन दुभंगत असल्यासारखे वाटत होते. गरजत ती म्हणाली, ''हे सरोवर भैरव जातीच्या राक्षसांचं आहे. तू इथे यायचं साहस कसं केलंस? हे पाणी पिणारा तू कोण?''

घाबरतच भैरवशास्त्री अुभा राहिला. मृत्यु अटळ आहे, याची त्याला खात्री वाटली.थरथरत दीन स्वरात तो बोलला, ''राक्षसीमाते! माझं नाव आहे भैरवशास्त्री, भैरव जातीच्या तुम्हा लोकांची भूक भागवण्यासाठीच बहुधा देवानं मला इथं पाठवलं असलं पाहिजे. पूर्वजन्मी आपलं दोघांचं गोत्र एकच असावं. तुला हे सत्य तर माहीतच असेल, की सगोत्र लोकांचं मांस खाणं निषिद्ध आहे. पंडितांनीही आपल्या शास्त्रात ही गोष्ट वारंवार सांगितलेली आहे.''

भैरवचे हे बोलणे ऐकून राक्षसी जोराने हसत टाळ्या वाजवू लागली आणि दुसरी एक तरुण राक्षसी झाडाआडून तेथे आली. तिने भैरवशास्त्रीकडे निरखून पाहून घेतले. नंतर ती आपल्या आईला म्हणाली, ''आई, मी तुला अगोदरच सांगितलं आहे. आपण भैरव खोऱ्यात असताना भिल्ल जातीच्या एका बाईनं आपल्याला अन्य प्राण्यांचं मांस शिजवायला शिकवलं होतं. पण माणसाचं मांस शिजवायची पद्धत मला माहीत नाहीय.''

तरुण राक्षसीचे बोलणे ऐकता ऐकता भैरवशास्त्रीला एक अुपाय सुचला. स्तुती-भरल्या डोळ्यांनी तिच्याकडे पहात तो म्हातारीला म्हणाला, ''रूप-रंग वगैरे सोडून दे, पण तुझी मुलगी सौंदर्यात गंधर्वकन्यांनाही मागं टाकणारी आहे. नाव काय सांगितलंस आपलं? अजून लग्न नाही झालं न?'' मृत्यु टाळायच्या आशेने तो काहीतरी बोलला.

''नाव आहे चतुरसुंदरी. हिच्या लग्नाच्या

जयंती मिश्रा

गडबडीतच तर आम्ही ते खोरं सोडून इथे आलो. तिथले राक्षस 'चतुरसुंदरी माझी आहे, माझीच होऊन राहील.' असं म्हणत आपसात भांडू लागले, अन् त्यांची भांडणं थांबेनात. त्यांच्यापासून स्वतःला वाचवण्यासाठी मुकाट्यानं आम्ही इकडे निघून आलो. नाहीतर आम्हाला भीती पडली होती की, भैरव खोऱ्याच्या राक्षस जातीचा कायमचा अंत होऊन जाईल.'' म्हाताऱ्या राक्षसीने सांगितले.

हात जोडून आकाशाकडे पहात भैरवशास्त्री म्हणाला, ''आहा! देवाची लीला कशी असते, हे कोणाला माहीत?'' अन् क्षण भर डोळे बन्द करून पुन्हा उघडत तो म्हणाला, ''आपल्या चतुरसुन्दरीला योग्य असा एक राक्षस इथून कोसभर दूर असलेल्या दाट जंगलात रहातो. तू 'होय' म्हणलीस, तर मी त्यालाही 'होय' म्हणायला लावीन बघ!''

त्याचे बोलणे ऐकून अत्यन्त खूश होत म्हातारी राक्षसी म्हणाली, ''अरे ए माणसा! तू किती चांगला माणूस आहेस! तू हा विवाह पक्का करून दिलास, तर मी तुला अगणित हिरे-जवाहिर देईन!''

''तुझ्यामुळे मला केवळ धन-प्राप्तीच होईल असं नव्हे, तर विवाह जमवून देण्यात यशस्वी झाल्यावर पुण्य-प्राप्तीही होईल.'' असे म्हणत भैरव तेथून निघाला. वैदेही राज्याकडे जाता जाता तो एका झाडाखाली बसून गंभीरपणे विचार करू लागला.

थोडा वेळ विचार केल्यावर भैरवशास्त्रीने एक निर्णय घेतला-कोसल व वैदेही राज्यात संबंध जोडून देण्याचा निश्चय म्हणजे केवळ भ्रमच आहे माझा ! अतिलोभाचं हे काम असाध्यही आहे! म्हाताऱ्या राक्षसीला आपल्या गोड बोलण्यानं आपण जसं आपल्या बाजूचं केलं, तसं त्या दाट जंगलातल्या राक्षसालाही आपण वश करून घेऊ. त्यालाही आशा दाखवून विश्वास संपादन केला तर त्याच्याकडूनही काही धन हडपता येईल!



तेथून उठून वेगाने तो दाट जंगलात पोचला. तिथल्या राक्षसाची गुहा शोधायला त्याला विशेष प्रयास पडले नाहीत; कारण बाहेर खूपशा प्राण्यांचे अस्थिपंजर पडलेले होते. गुहाही जवळच होती.

भैरवशास्त्रीने मनःपूर्वक आपल्या इष्ट देवतेचे स्मरण केले अन् निर्भय होऊन तो गुहेसमोर उभा राहिला. छानपैकी घोरत राक्षस गाढ झोपलेला होता. भैरवशास्त्री उच्च स्वरात ओरडला, ''राक्षसप्रभु! मी आहे भैरवशास्त्री, तुझं कल्याण करायला आलोय!''

राक्षस ताबडतोब उठून बसत ओरडला, ''माझ्यासारख्या मोठ्या राक्षसाला उठवायचं धाडस केलंस तू? तुझ्या धाडसाला दाद देतो मी! त्याबद्दल खूश होऊन तुला हिरे-जवाहिर बक्षिस द्यायचा विचार आहे माझा. बघ इथे कोपऱ्यातच पडलेले आहेत! पण उपयोग काय? तासाभरानंतर तू या जगात नसणार; परलोकात पोचलेला असशील तू!''

राक्षसाच्या बोलण्याने भैरवशास्त्री मनातल्या मनात खूप घाबरला; पण भय लपवून तो म्हणाला, ''राक्षसप्रभुच्या प्रशंसेला पात्र झालो, हेच खूप झालं मला! कृतज्ञ आहे मी! पण राक्षस-संप्रदायानुसार आपलं भलं करणाराला त्रास देणं पाप आहे, आत्मद्रोह आहे तो! राक्षस जातीला कलंक ठरेल तो! तुम्ही आत्ताच झोपेतून जागे झालात ना, म्हणूनच ही रीत तुमच्या ध्यानात आली नसावी!''

त्याचे बोलणे ऐकून राक्षस हसत म्हणाला, ''भैरव! तुझ्या वाक्-चातुर्याची स्तुती





करावी, तितकी थोडीच ठरेल. पण तू आपल्या प्राणांची पर्वा न करता इतका दूर चालत आला आहेस. बोल, कोणत्या कामासाठी आलायस?''

''तुमच्यासाठी एक वधू निवडून आलोय.'' भैरव हसत अुत्तरला.

''लग्न! वधू! खरंच बोलतोयस, की चेष्टा करतोयस माझी? मला तर वाटलं होतं की, या घंटाकंठच्या नशिबी हे भाग्य लिहिलेलंच नाहीय!'' आश्चर्य प्रकट करत राक्षस म्हणाला.

''हे घंटाकंठ प्रभु! जन्म-पत्रिकाही कधी कधी कालसंदर्भामुळे बदलल्या जातात. मी ज्या कामासाठी इथे आलोय, ते असं आहे-'' असे म्हणून भैरवने ती म्हातारी राक्षसी व चतुरसुन्दरी यांची हकिकत त्याला सांगितली.

ते ऐकून राक्षस आनन्दाने अुड्याच मारू लागला! ''वा, वा! चल आत्ताच; बस माझ्या खान्द्यावर! त्या जंगलात ताबडतोब जाअू आपण!'' असे म्हणत तो भैरवला घेअून जायला अुतावळा झाला.

भैरवशास्त्रीने भराभरा गुहेजवळ पडलेली काही रत्नं आपल्या अुपरण्यात गुंडाळली अन् घट्ट गाठ मारली. नंतर तो राक्षसाच्या खांद्यावर बसला. अंधार पसरण्यापूर्वीच ते त्या छोट्या जंगलात पोचून तरुण राक्षसीच्या निवासाजवळ गेले.

तरुण राक्षस घंटाकंठला येताना पाहून राक्षसी चतुर-सुन्दरी आपल्या आईला म्हणाली, ''छान झालं बघ, अंधार पडण्यापूर्वीच इथे पोचलाय हा! नाहीतर त्याचं रंगरूप पहाता आलं नसतं मला.''

इतक्यात राक्षस व भैरवशास्त्री दोघे त्यांच्याजवळ पोचले. चतुरसुन्दरीला पहाताच राक्षस म्हणाला, ''वा! सौंदर्याचा जिवंत नमुनाच म्हणायला हवा हा! राक्षस-रूपातली मोहिनीच वाटतेय की ही! मी तयार आहे या लग्नाला!''

म्हाताऱ्या राक्षसीने कन्येला विचारले, ''बोल, तुझं काय मत आहे?'' ''नवऱ्याची इच्छा, ती माझी पण इच्छा आहे.'' असे म्हणून चतुरसुन्दरी दोन पावले मागे सरकली. मुलीचा हात पकडून म्हातारी राक्षसी तिला घेअून घंटाकंठ राक्षसाजवळ आली, अन् तिने तिचा हात घंटाकंठच्या हाती दिला.

''पाणिग्रहण झालं; म्हणजे विवाहच झाला समजा.'' असे म्हणत टाळ्या वाजवत भैरवशास्त्री म्हातारीला म्हणाला, ''राक्षसीमाते! माझं बक्षिस विसरली तर नाहीस ना?''

''ते कसं विसरेन?'' असे म्हणून म्हातारीने हिरे, रत्ने आणि जवाहिरांनी भरलेली एक पोटली त्याच्या हवाली केली.

राक्षसाची रत्नांची पोटली एका खांद्याला अन् म्हातारीची दुसऱ्याला अशी लटकावून भैरवशास्त्रीने हात जोडून त्या दोघांना नमस्कार केला, डोके अुचलून आकाशाकडे पहात तो राक्षसाला म्हणाला, ''राक्षसप्रभु! तुम्ही एकटे नव्हेत, गृहस्थ आहात. एक रहस्य सांगून मी राजद्रोह करत आहे, हे मला ठाअुक आहे. पण तुम्हाला सांगणं हा माझा धर्मही आहे. आमच्या राज्यात असणारे प्राणी तुम्ही अनिर्बंधपणे मारून खात असता, मानवांनाही तुम्ही सोडत नाही. हे आता महाराजांच्या ध्यानात आलं आहे. तुम्हाला मारून टाकण्यासाठी ते ससैन्य इकडे येत आहेत. तुम्ही तिघंही आजच रात्री भैरव घाटीकडे जाणं जमणार नाही, पण शार्दुल खोऱ्याकडे निघून जा अन् स्वतःचं रक्षण करा.''

घंटाकंठ जोराने हुंकार भरत अन् जमिनी-वर पाय आपटत म्हणाला, ''मानवांना भिअून आपली गुहा सोडून पळून जाअू मी?''

भैरवशास्त्री विनयाने म्हणाला, ''राक्षसप्रभु, याला 'पळून जाणं' म्हणता येणार नाही. तुमचं कुटुंब आता मोठं झालंय. त्याला अनुरूप अशी प्रशस्त जागा तर हवी ना? ती गुहा तुमच्या गृहस्थ-जीवनाला योग्य होणार नाही. तसं तर तुम्हाला फार दूरही जावं लागणार नाहीय. बास, कोसलची सरहद्द ओलांडून जरा दूर जाअून रहाणार आहात तुम्ही.'' इतके बोलून त्याने नंतर म्हातारीकडे पाहिले.

म्हातारी राक्षसी म्हणाली, ''भैरवचा सल्ला योग्यच आहे. चला, जाअू या आपण इथून!'' ते तिघेही तेथून निघाले. जावई आणि मुलगी म्हातारीच्या मागे-मागे चालत राहिले. आपल्या खांद्यांवर लटकणाऱ्या पोटल्यांच्या वजनामुळे धापा टाकत भैरवशास्त्री स्वतःशीच बोलू लागला, ''दारिद्र्य काही ओझं नव्हे, पण कधी कधी धनाचं ओझंही माणसाला दमवतं खरंच!'' अन् हसत हसत तो आपल्या नगराकडे चालू लागला.



# अुत्तम काव्य

सिद्धपुरीत कवींचा मोठ्या प्रमाणावर आदर केला जाई. तिथल्या लोकांची प्रसिद्ध कवींप्रमाणेच स्वत: कविता रचून त्या इतरांना ऐकवण्याची तीव्र इच्छा असे. तसे करून महाराजांकडून बक्षिस मिळवण्याची त्यांची आशा असे.

ते सारेजण दरबारी कवि कुलशेखरकडे येअून महाराजांना भेटायची आपली इच्छा व्यक्त करत.

सिद्धपुरीपासून सुमनपुर दोन मैल अन्तरावर होते. तेथे काही प्रमुख कवि होते. त्याचबरोबर तिथे अशाही काही व्यक्ती होत्या की त्यांची कविता रचण्याची शक्ती शून्यच म्हणण्यासारखी होती. कुमारभट्ट हा त्यांच्याचपैकी एक होता. स्वत: रचलेली दोन काव्ये घेअून तो एकदा कुलशेखरला भेटला.

दोहोंपैकी श्रेष्ठ ठरणारे काव्य महाराजांना अर्पण करायची कुमारभट्टची इच्छा होती. कुलशेखरने त्याचे सांगणे मान्य केले. आता कुमारभट्टचा आनन्द गगनात मावेनासा झाला. त्याने कुलशेखरला आपले पहिले काव्य वाचून दाखवले.

दोन तास मोठ्या सहनशीलतेने कुलशेखरने ते ऐकून घेतले. पण पहिले काव्य संपल्यावर कुमारभट्ट दुसरे वाचायला सुरुवात करणार, इतक्यात त्याला थांबवत कुलशेखर म्हणाला, ''कविराज, आपलं दुसरं काव्य वाचून दाखवायची गरज नाही. तुमच्या दोन्हीं काव्यांपैकी हेच अुत्तम असलं पाहिजे.''

आता कुठे आपली काव्य प्रतिभा कशी व किती आहे, हे कुमारभट्टच्या ध्यानात आले. कुलशेखरला प्रणाम करून तो तेथून निघून गेला.

**नागनाथ परांडे**





# सम्राट अशोक

## ११

(पाटलीपुत्रमधे महाराज बिन्दुसार यांची प्रकृति अतिचिन्ताजनक होती. तक्षशिलाहून सुशेमला आणि अुज्जयिनीहून अशोकला ताबडतोब निघून येण्यासाठी प्रधानमन्त्र्याने दूतांकरवी निरोप पाठवले होते. सुशेमच्या प्रवासात अडथळा आणण्यासाठी अशोकचा मित्र यश याने त्या दोन नर्तकींना तक्षशिलाकडे पाठवले. यश जेव्हा अुज्जयिनीला परतला, तेंव्हा ज्योतिषी बनून आलेल्या सुशेमच्या मित्राचे कारस्थान त्याने अुघडकीला आणले अन् अशोक समोरच त्याला कैद केले. पाटलीपुत्रहून निरोप मिळाल्याबरोबर यशने अशोकला सैन्यासह तिकडे जाण्यासाठी राजी केले.) - यानन्तर

पाटलीपुत्रकडे प्रयाण करण्यापूर्वी सर्व काही सांगण्यासाठी अशोकने आपल्या दलनायकांना बोलावले. राजभवनासमोर एकत्र आलेल्या त्यांना संबोधून यश बोलला, ''मित्रांनो, अत्यंत सजगपणे सर्व व्यवहार करायची वेळ आलेली आहे. सतर्क राहून आपणाला आपलं ध्येय साधायचं आहे. चन्द्रगुप्त मौर्य यांनी या विशाल साम्राज्याची स्थापना केली होती. आपण काय आपल्या डोळ्यांसमोर ते विच्छिन्न होताना पहात रहायचं; की कंबर बांधून त्याचं रक्षण करायचं, हे ठरवायची वेळ आलेली आहे.''

''साम्राज्य रक्षणासाठी आम्ही यथाशक्ती लढू नक्कीच! त्याबाबत आम्ही कसलीही कमतरता ठेवणार नाही. आमचे युवराज अन् त्यांचे निकट मित्र यांच्यावर आमचा पूर्ण विश्वास आहे. आता सांगा, की साम्प्रत मगध साम्राज्य कोणत्या संकटात सापडलं आहे?



त्याचे शत्रु कोण आहेत?'' व अवंतीचा सर्वसेनाध्यक्ष याने विचारले.

''मित्रांनो, आतल्या शत्रूशी लढताना धैर्याबरोबर अतूट विश्वास आणि चित्तशुद्धीची अत्यंत गरज असते.'' यश बोलला. ''तुम्हीच तर आमचे नेता आहात. तुम्ही ज्या विश्वासाबद्दल बोलत आहात, तो आमच्यातही भरा.'' एका दलनायकाने म्हटले.

''विश्वास कोणी असा भरून भरत नसतो. स्वतःच निश्चित केलेल्या ध्येयावर तो अवलंबून असतो. ध्येय अुन्नत आणि अुत्तम असेल तर हृदयात अतूट विश्वास आपोआपच अुत्पन्न होता. आपण स्वतः याची सवय करून घ्यायला हवी. आपल्या महाराजांची प्रकृती फारच क्षीण झालेली आहे. कोणत्याही क्षणी त्यांचा मृत्यु होणं शक्य आहे. त्यांच्या मृत्यूनंतर सिंहासनावर बसायला कोण योग्य आहे? याबद्दल तुमचं मत काय आहे?'' यशने विचारले.

थोडा वेळ गप्प राहिल्यानन्तर सेनाध्यक्ष म्हणाला, ''मी असं ऐकलंय की, महाराजांनी युवराज सुशेमना राज्याभिषेक करायचा निर्णय अगोदरच घेतला आहे. पण मनातून मात्र मला असं वाटतंय की हा राज्याभिषेक न झाला तर बरं!''

''असं का बरं म्हणताय तुम्ही?'' यशने विचारले.

''युवराज सुशेम केवळ दुष्टच नव्हे, तर मूर्खही आहे. एकदा त्यांच्या मागणीवरून मी एक चलाखसा सैनिक त्यांच्याकडे पाठवला. अंगरक्षक म्हणून त्याची नियुक्ती झाली. एकदा मी जवळच अुभा असताना एका अुडत्या कावळ्याची विष्ठा त्यांच्या पगडीवर पडली. यावर सुशेम अुगीचच त्या अंगरक्षकावर नाराज झाला अन् त्यानं त्या अंगरक्षकाला मृत्युदण्ड दिला. असला अुद्दंड स्वभावाचा माणूस जर राजा बनला, तर प्रजेवर काय गुदरेल हे सांगायची जरूर नाही नं?'' सेनाध्यक्ष दुःखाने म्हणाला.

''अशा परिस्थितीत या अयोग्य माणसाच्या हाती राज्याधिकार जाअू नये, म्हणून आपण आपले प्रयत्न चालू ठेवायला हवेत. आणखी एक गोष्ट तुम्हाला विचारायची आहे मला. मगध सिंहासनावर बसायची अशोकची योग्यता आहे काय?'' यशने विचाले.

''अशोक अत्यंत योग्य आहेत याबद्दल शंकाच नाही.'' सेनाध्यक्ष जोर देत म्हणाला.

त्याच वेळी अशोकने तेथे प्रवेश केला.

''मगध साम्राज्याच्या भावी सम्राट अशोकना सविनय प्रणाम!'' सेनाध्यक्ष आणि अन् दलनायक दोघेही एकदम ओरडले. त्यांनी मस्तक लववून प्रणामही केला.

''आता एका क्षणाचाही विलम्ब नको. इथे कोणकोणत्या दलनायकांनी रहावं याचा निर्णय सेनाध्यक्ष करतील. गरज पडली तर लढून त्यांना राजभवनाचं रक्षण करावं लागेल. बाकी सर्वांनी सकाळीच राजभवनासमोर हजर रहावं. सूर्योदयापूर्वीच आपल्याला युवराजांबरोबर निघावं लागेल.'' यशने सांगितले.

सर्व दलनायकांनी स्वीकृतीदर्शक हात अुचलले. ''मित्रांनो, आमच्या आजोबांनी सुस्थापित केलेल्या राज्याच्या संरक्षणासाठी तुम्ही सर्वजण जो सहयोग देत आहात, त्याबद्दल मी तुम्हा सर्वांचा कृतज्ञ आहे. ही गोष्ट मी कधीच विसरणार नाही.'' अशोक बोलला.

''प्रभु, महाराजांना देवाज्ञा झाली!'' असे म्हणत एक दूत आत आला. युवराज सुशेम त्यावेळी एका खोलीत बसून मद्य पीत होता. तिथे दोन परदेशी व्यापारीही होते. वार्ता ऐकल्याबरोबर त्याचे लक्ष विभागले गेले. अन् त्याने डोके अुचलून वर पाहिले. त्यांच्या समोर एक रत्न ठेवलेले असून त्याचा अद्भुत असा प्रकाश त्या खोलीत पसरलेला होता.

''तुला काय वटातंय? बातमी दिलीस म्हणून मी तुला हे रत्न बक्षिस देईन? मुळीच नाही. तुला इथे कोणी येअू दिलं?'' सुशेमने



नाराजीने त्या दूताला विचारले. दूताने अवेळी आत येअून रंगाचा बेरंग केला, असेच सुशेमला वाटत होते.

''तुम्हीच तर परवानगी दिलीत स्वामी. प्रधानमन्त्र्याकडून दूत आलाय-असं तेंव्हा तुम्ही त्याला ताबडतोब आत आणायला सांगितलंत.'' तिथेच अुभा असणारा सुशेमचा खास सल्लागार सुबाहू म्हणाला.

''असं होय?'' असे म्हणून सुशेमने विचारले, ''तात, मरून गेले काय?''

''होय स्वामी, अगदी आत्ताच प्रधानमन्त्र्याकडून हा निरोप पोचलाय.'' सुबाहूने सांगितले.

परदेशी व्यापाऱ्यांना संबोधून सुशेम म्हणाला, ''ठीक आहे. आपण पुन्हा नंतर भेटूया.''



दोन्ही व्यापाऱ्यांची दृष्टी आता मेजावरच्या रत्नावर खिळली. तक्षशिलामधे व्यापार करण्याची परवानगी मिळण्याच्या उद्देशाने हे रत्न सुशेमला भेट दिले होते. पण आता तर त्याबाबत काही निश्चित झालेले नव्हते. आता रत्न परत घ्यावे की तिथेच सोडून जावे याबाबत ते पेचात पडले होते.

रत्न आपल्या हातात घेऊन सुशेम म्हणाला, ''काही मौल्यवान रत्नं घेऊन पाटलीपुत्रला या. तक्षशिलामधेच नव्हे, तर संपूर्ण मगध साम्राज्यात व्यापार करायची परवानगी देईन तुम्हाला.''

''तुमचा राज्याभिषेक कसली अडचण न येता पार पडावा अशी आमची आशा आहे.'' असे म्हणून ते व्यापारी तेथून निघून गेले.

''मला ताबडतोब पाटलीपुत्रला जायचंय. सुबाहू आपल्या दलनायकांना बोलावून घे. फक्त काही अंगरक्षक बरोबर घ्यावेत, की थोडे सैन्यही घ्यावे याचा विचार पडलाय मला.'' सुशेम बोलला.

''सैन्य नेणंच योग्य ठरेल.'' मागल्या बाजूने कोणीतरी बोलले.

सुशेमने वळून पाहिले तेंव्हा त्याला दिसले की हे बोलणारा त्याचा प्रमुख गुप्तहेरच आहे. तो पाटलीपुत्रमधे रहात असे.

''काय झालं? असा धापा का टाकत आहेस?'' सुशेमने विचारले.

''प्रभु, मी आत्ताच पाटलीपुत्रहून इथे पोचतोय. मी सांगणार आहे, ती बातमी फार महत्वाची आहे. युवराज अशोक पाटलीपुत्रला पोचतच आहेत.'' गुप्तहेर उत्तरला.

''काहीतरी बोलू नकोस. तू या युवराज अशोकबद्दल बोलत आहेस, तो सध्या हालचाल न करता येणारा अन् निर्जिव वाटणारा मासाचा गोळाच बनलेला आहे. उभासुद्धा राहू शकत नाही तो. उज्जयिनीत तो मृत्यूच्या प्रतिक्षेत क्षण क्षण मोजतोय.'' सुशेम व्यंगभरल्या स्वरात म्हणाला.

''सैन्यासह स्वतः घोड्यावरून येत असलेल्या त्यांना मी या डोळ्यांनी पाहिलंय!'' गुप्तहेर खात्रीने बोलला.

सुशेमचा तरीही विश्वास न बसून त्याने विचारले, ''खरोखर?''

''माझ्या बोलण्यात एक अक्षरही खोटं असेल तर प्रधानमन्त्र्याबरोबरच तलावात बुडवा. तुम्हाला ताबडतोब सैन्यासह पाटलीपुत्रला जायला हवं. नाहीतर मला शिक्षा करायचा आपला हक्कही नाहीसा



होईल.'' गुप्तहेर बोलला.

''तर मग?'' ''उज्जयिनीहून आलेल्या त्या नर्तकी कुठायत? त्यांची नावंसुद्धा विसरलो मी.'' सुशेम नाराज होत बोलला.

''काल भेटायला आलेल्या त्या नर्तकींबद्दलच बोलताय?'' सुबाहूने विचारले.

''होय होय, काल त्याच सांगत होत्या की, आपण अशोकला पांगळा बनवलंय, त्याला पक्षाघात करवलाय.'' सुशेम जास्त चिडला.

''अशोक मूर्ख नाहीय अन् तो पक्षाघातानं आजारीही नाहीय.'' गुप्तचर पुन्हा दृढतेने म्हणाला.

''माझ्याच बोलण्याचं खंडन करायचं धाडस करतोयस? तो मूर्ख नव्हे, तर आणखी काय आहे?'' सुशेम ओरडला.

''शान्त व्हा प्रभु! आपण माझ्यावर विश्वास ठेवला नाहीत, तर मी काहीच करू शकणार नाही. आपण सोपवलेली जबाबदारी मी आजवर निभावत आलोय. माझ्या प्रामाणिकपणाबद्दल तुम्ही मला मौल्यवान भेटी दिल्या आहेत. विश्वासपात्र नोकर म्हणूनच मी आपलं कर्तव्य निभावलं आजवर. माझ्या प्रामाणिकपणाबद्दल शंका घेऊ नका. मला जायची परवानगी द्या.'' गुप्तहेर दुःखाने बोलला. ''नाही!'' म्हणत सुशेम ओरडला. नंतर तो म्हणाला, ''तुला त्या नर्तकींसमोर उभा करीन. सुबाहू, त्यांना घेऊन ये!''

''आता त्या कुठं आहेत युवराज?'' सुबाहूने विचारले.

''मला काय माहीत? माझ्याकडून बक्षिसी वसूल करून निघून गेल्या त्या.



नगरातच कुठेतरी असतील ना? आपले सैनिक त्यांना घेऊन येऊ शकणार नाहीत का?'' सुशेमने पृच्छा केली.

इतक्यात उज्जयिनीत रहाणारा सुशेमचा एक गुप्तहेर तेथे आला. सुशेमने आतुरतेने त्याला म्हटले, ''बरा वेळेवर आलास. अशोक सैन्यासह पाटलीपुत्रला गेल्याची वार्ता तर घेऊ आला नाहीस ना?

''ओहो! तर इथे ती वार्ता आधीच समजली? अशोक पाटलीपुत्रकडे निघताच, मीही इकडे यायला निघालो.'' गडबडत हेराने बातमी दिली.

''त्या नर्तकी खोटारड्या निघाल्या तर! अशोकला पक्षाघात झालाच नव्हता का?'' सुशेमने आवेशात येऊन विचारले.

''पक्षाघात? ते तर पहिल्यापेक्षाही चांगले



धट्टेकट्टे झालेत. खूप अुत्साहाने घोड्यावरून निघाले ना ते!'' हेर अुत्तरला.

''बास, बास! गप्प बस! त्या लबाड नर्तकींना पकडून घेअून ये. शरीराचे तुकडे-तुकडे कर त्यांच्या! आग लावून जाळून टाक त्यांना! त्यांचा गळा घोटून टाक.'' आवेशात येअून सुशेम वेड्यासारखा ओरडत सुटला!

सूर्य पश्चिमेच्या डोंगरावर अुतरत होता. राजा बिन्दुसारचा भौतिक देह अन्तिम संस्कारासाठी नदीकिनारी आणण्यात आला. त्याचे चार पुत्र तेथे हजर होते. चितेला अग्नी कोणी द्यायचा, हे अजून ठरत नव्हते.

''सहापैकी कोणाच्याही हातून हे कार्य करवता येतं का?'' सेनाध्यक्षाने प्रधान-मन्त्र्याला विचारले.

राजपुरोहिताकडे पहात प्रधानमन्त्र्याने विचारले, ''अग्नि द्यायचा मुहूर्त जवळ आला का?''

''आणखी एक घंटा अवकाश आहे'' पुरोहिताने अुत्तर दिले. ''अशोक कोणत्याही क्षणी येईल अशी वार्ता आहे. सुशेमनन्तरचा तोच वारस आहे, अशी माझी धारणा आहे.'' प्रधानमन्त्री म्हणाला. ''होय, अन् ते धर्मसम्मतही आहे.'' पुरोहितानेही आपले मत सांगितले. दूर अुभे असणारे काही प्रजाजन ओरडले, ''पहा, पहा! युवराज अशोक आले!''

जवळच अुभे असलेले चार राजपुत्र चकित झाले! थोड्या वेळाने गडबड-गोंधळ सुरू झाला, हाहा:कार माजला.

''काय घडतं आहे?'' प्रधानमन्त्र्याने काळजीने विचारले.

''राजकुमाराच्या हुकुमाने काही सैनिक अशोकला अडवत आहेत. युवराज अन् त्यांच्या सेनेवर ते दगडफेक करत आहेत!'' धावत आलेल्या एका सैनिकाने वार्ता दिली.

''हे भगवान्! असल्या वेळीही राजकुमारांच्यात झगडे?'' म्हणत राजपुरोहिताने दु:ख प्रकट केले.

सेनापतीच्याच जवळ एका टेकाडावर अुभे राहून ते ओरडू लागले, ''आपला कोणाही सैनिकाने अशोकला अडवू नये. जो आज्ञापालन करणार नाही, त्याला फाशीची शिक्षा देण्यात येईल.''

राजकुमारांनी अगोदरच काही दलनायकांना अगोदरच बक्षिसे वगैरे दिलेली होती, त्यामुळे काही सैनिकांनी अशोकला अडवायचा प्रयत्न केला. अशोकमागे

बलशाली सैन्य असल्याची त्यांना कल्पना नव्हती. यशने आज्ञा दिली की, ''अशोकला अडवायचा प्रयत्न करणारांना मारून टाकले जाईल.''

सेनापतीही ओरडत राहिला की, ''आपल्या सैनिकांनी अशोकच्या रक्षणासाठी तत्पर व्हावे.''

''चारही राजकुमार सुशेम येण्याची वाट पहात आहेत. ते अशोकचा द्वेष करतात हेही मला माहीत होतं. पण असल्या वेळी ते इतकं पाप करायला उद्युक्त होतील याची मी कल्पनाच केली नव्हती.'' प्रधानमंत्री म्हणाला.

''अग्निसंस्काराची वेळ झालेली आहे. काय करावं हे आता कळत नाहीय.'' पुरोहित स्वत:शीच बडबडत होता.

इतक्यात अशोक तेथे पोचला.

''युवराजांचं स्वागत असो. अशा वेळी आपणाला असल्या परिस्थितीला तोंड द्यावं लागलं, याचा मला खेद वाटतोय. आपण सकुशल पोचलात हे बरं झालं. आम्हाला संतोष आहे.'' प्रधानमंत्री म्हणाला.

''आपल्या पित्याच्या शरीराला अग्नी द्या.'' राजपुरोहित अशोकला म्हणाला. थोड्याच वेळात तो संस्कार पार पडला.

''सिंहासन रिकामं रहाणं उचित नव्हे. राजाच्या चितेला अग्नि देणाराच सिंहासनाचा उत्तराधिकारी बनतो. आजच रात्री आपणाला राज्याभिषेक व्हायला हवा. आवश्यक ती व्यवस्था करण्यात आलेली आहे.'' प्रधानमन्त्री म्हणाला.

''मी राज्यकारभार संभाळीन. पण राज्याभिषेक समारंभ आत्ताच नको. उच्च अधिकारी, प्रमुख व्यक्ती अन् सामन्त सर्वजण यासाठी राजी आहेत की नाही, हे मला अगोदर कळायला हवं.'' अशोक गंभीर आवाजात बोलला.

''आपलं बोलणं आपल्या उच्च मनोप्रवृत्तींना साजेसं आहे.'' प्रधानमन्त्री कौतुकाने बोलला.

थोड्याच वेळात समजून चुकले की अशोकला मारायला आलेले सर्वजण चार राजपुत्रांसह - मारले गेले आहेत. राजभवनात शोककळा पसरली. परिचारिकाही दीन स्वरात विलाप करू लागल्या.

**क्रमशः**



# गुरु दक्षिणा

दृढनिश्चयी विक्रमराजा पुन्हा त्या जुन्या झाडाजवळ गेला; फान्दीवरून प्रेत काढून आपल्या खांद्यावर टाकले अन् मौन धारण करून तो स्मशानाकडे निघाला. इतक्यात प्रेतात निवास करून असणारा वेताळ बोलू लागला, ''माझं म्हणणं तू ऐकत का नाहीयस, हे कळत नाही मला राजा! माझा यात कसला स्वार्थ नाही, तेही तुला छान माहीत आहे. मी तर तुझ्या भल्यासाठीच सांगत आहे ना? जाणून-बुजून आपले प्राण संकटात का लोटत आहेस? तू पहातच आहेस की इथे विषारी साप, भूत-प्रेत अन् कोणत्याही क्षणी तुझ्या मृत्यूला कारण बनतील असे भयंकर प्राणी आहेत! तुझ्या निर्भयतेचं अन् आग्रहीपणाचं मला मोठं आश्चर्य वाटत आहे. कदाचित कोणी मित्र, कोणी मित्र राजा किंवा तू ज्यांच्याकडून विद्या मिळवलीस असा कोणी गुरू तुझ्याकडून

## वेताळ कथा



आपलं काम साधून देऊ पहात असावा. आपला प्राणप्रिय मित्र किंवा कोणी दोस्त राजा यांच्यासाठी तू हे काम करत असशील तर मी तुला दोष देणार नाही. पण तुला विद्यादान देणाऱ्या गुरूसाठी तू हा विडा अुचलला असशील तर मात्र तुला योग्य-अयोग्य यांचा विचार करायला हवा. माझ्या दृष्टीनं ते विवेकपूर्ण काम ठरेल. विद्या देणाऱ्या गुरूला प्रत्येक शिष्य, शिक्षण समाप्तीच्या वेळी गुरुदक्षिणा देतोच. यानंतर गुरुनं शिष्याकडून आणखी काही मिळवण्याची आशा करणं गैर आहे. गुरूला दक्षिण देण्यासाठी शिष्याला अवास्तव श्रम करावे लागणंही अुचित नव्हे. काही गुरूंच्या मागण्या अवास्तव असतात. मागणीच्या मागे त्यांचा वाईट स्वभाव दडलेला असतो. अुदाहरण म्हणून मी तुला अुपासक नावाच्या गुरूची गोष्ट सांगतो. नीट लक्षपूर्वक ऐकलीस, की तुझा थकवाही दूर होईल अन् तुला काही बोधही मिळेल.'' वेताळ गुरू अुपासक याची गोष्ट सांगू लागला.

खूप जुनी गोष्ट, बदरिका वनात एक सुप्रसिद्ध गुरुकुल होते. गुरुचं नाव होतं अुपासक. कोणीही त्याच्याकडे आला, तरी तो त्याचा शिष्य म्हणून स्वीकार करी. अन् ज्याच्या त्याच्या आवडीप्रमाणे त्यांना शिक्षण देई.

अुपासककडे विद्या-प्राप्तीसाठी कसली मर्यादा नसे. शिष्याला वाटेल तितका काळ तो शिकू शकत असे आणि हवे तेंव्हा गुरूची परवानगी घेअून निघून जाअू शकत असे. काही शिष्य केवळ एकादेच वर्ष शिकत, तर काही कित्येक वर्षे विद्याभ्यास करत रहात.

''शिक्षणाचा आरंभ होतो, पण अन्त कधीच होत नसतो. गुरू म्हणून, मला जितकं अन् जे माहीत आहे, ते मी आपल्या शिष्यांना शिकवतो. त्यांना शिकवता शिकवता मी ही काही नव-नवीन शिकत असतो; आपलं ज्ञान वाढवत असतो. विद्याभ्यास हेच माझ्या जीवनाचं लक्ष्य आहे, त्यासाठीच मी हे गुरुकुल चालवत असतो. आपलं जीवनाचं ध्येय दृष्टीसमोर ठेवून ज्याला, जिथे, जितकं ज्ञान मिळवायचं असेल, ते त्याने मिळवावं. हा निर्णय तर तुमच्याच हाती आहे.'' असे अुपासक आपल्या शिष्यांना म्हणे.

शिष्य जोपर्यन्त गुरुकुलात असत, तोपर्यन्त त्यांना शारीरिक श्रमही भरपूर करावे लागत; शिक्षणाचा तो एक अनिवार्य भाग असे. गुरुकुलासाठी आवश्यक भाजीपाला, फळे-फुले यांची व्यवस्था शिष्यांनाच करावी लागे. ती त्यांचीच जबाबदारी मानली जाई. रहाण्याची जागा व अन्य साऱ्या आवश्यकता सोयी वगैरे शिष्यांनीच पहायच्या असत. अुपासक म्हणे की, 'शिष्यांचे श्रम हीच त्यांची गुरुदक्षिणा.''

रंजन व भंजन नावाच्या दोन शिष्यांनी एकदा या गुरुकुलात प्रवेश मिळवला. ते दोघे म्हणाले की, ''गुरुजी, आम्ही मुख्यतः वैद्यक विद्या मिळवण्यासाठी गुरुकुलात आलो आहोत. आमची इच्छा आहे की, जमेल तितक्या लवकर विद्याभ्यास पूर्ण करून परत जावं. इतर शिष्यांप्रमाणे शारीरिक श्रम करण्यासाठी आमच्यावर दबाव आणू नये. यासाठी आपला सहयोग असेल, तरच हे जमेल. इथे असेपर्यन्त सारा वेळ विद्याभ्यासातच घालवायची आमची इच्छा अन् आपणाकडे विनन्ती आहे.''



अुपासकने त्यांची विनन्ती मान्य केली. त्यामुळे अन्य शिष्य चिडून गुरूकडे जाअून म्हणाले, ''सर्वांसाठी सारखेच नियम असायला पाहिजेत. सर्वांना एकसारखाच न्याय मिळावा. आपण हा जो पक्षपात करताय, तो अुचित आणि न्यायसंगत आहे काय?''

त्यांच्या या मागणीला हसत अुपासक म्हणाला, ''रंजन आणि भंजन यांनी प्रथमपासूनच खूप श्रम करून आयुष्य घालवलंय. आता त्यांच्यात विद्याभ्यासाची इच्छा अुत्पन्न झालीय. तुम्ही तर शारीरिक श्रमांना अनभिज्ञ आहात, यासाठीच तो तुमच्या शिक्षणाचा अनिवार्य भाग आहे. रंजन-भंजनला त्यातून सूट दिली गेली आहे.''

तरीही आपली तक्रार मांडत शिष्य म्हणाले, ''सुरुवातीला तर आपण म्हणालात की, शारीरिक श्रम हीच माझी गुरुदक्षिणा आहे; अन् आता म्हणताय की तो विद्याभ्यासाचाच एक भाग आहे? आपलं हे बोलणं तर आमच्या आकलनापलिकडे आहे. रंजन-भंजनकडून आपण गुरुदक्षिणा नाही घेणार?''

''प्रत्येकाकडून गुरुदक्षिणा घेईनच. शारीरिक श्रम जे करत नाहीत, त्यांच्याकडून जी दक्षिणा घेईन, ती अगदीच सामान्य नसेल. सामान्य शिष्य ती देऊच शकणार नाहीत विद्याभ्यास संपल्यावर रंजन-भंजनला शारीरिक श्रम न केल्याबद्दल नक्कीच पश्चात्ताप वाटेल. दुःख होईल.'' गुरु म्हणाला.

गुरुजी जो विचार करतात, तो खोलवर



असतो अन् मगच ते निर्णय घेतात; ही गोष्ट शिष्यांना चांगलीच ठाऊक होती. त्यांच्या अुत्तरामुळे ते तृप्त झाले आणि निश्चिन्त होअून निघून गेले. तीन वर्षे निघून गेली. एके दिवशी रंजन-भंजन गुरूला भेटून म्हणाले, ''गुरुजी, आजवर आम्ही जेवढं शिकलो तेवढं आमच्या अुपजीविकेसाठी पुरेसं आहे. आम्ही एवढ्यावर संतुष्ट आहोत. आता आम्हाला परत जायची परवानगी द्या.''

''मला गुरुदक्षिणा न देताच जाणार तुम्ही?'' अुपासकने विचारले.

दोघेही शिष्य आता घाबरलेच. त्यांनी विचारले, ''आपली काय अपेक्षा आहे?''

''इतर शिष्यांप्रमाणे तुम्हीही शारीरिक मेहनत केली असती, तर तीच माझी गुरुदक्षिणा झाली असती. पण तुम्ही तर तसं काही केलं नाहीत. माझ्याजवळ तुम्ही तीन वर्षं शिकलात. ते काही सर्वसाधारण शिक्षण नव्हे. तुम्ही आता आपापल्या ठिकाणी जा. आणि वैद्यकी चालू करा. बरोबर एक वर्षानं मी तुमच्याकडे येईन. प्रत्येकाने तेंव्हा एक लाख अशर्फ्या द्यायला हव्यात मला. तीच माझी गुरुदक्षिणा!'' अुपासक म्हणाला.

''एकाच वर्षात लाख अशर्फ्या? आम्हाला शक्य होईल का ते?'' ''मुलांनो, या देशचा राजा प्लवंग कसल्याशा विचित्र रोगानं पछाडलाय. आजपर्यंत त्या रोगाचं औषध कोणी शोधू शकला नाही. आपल्या आश्रमात मीही त्या अडचणीचा तोडगा शोधायचा प्रयत्न केला. प्लवंगच्या रोगाचा बरोबर अुपाय करणाराला लाख अशर्फ्या इनाम मिळेल. तुम्ही आपापले प्रयत्न चालू ठेवा. जिद्दीने प्रयत्न केलेत, तर कोणतंही काम असाध्य नाही.'' गुरु त्यांना म्हणाला.

रंजन आपले नगर भुवनगिरी येथे परत गेला. तिथला प्रमुख वैद्य चंडीदास याला भेटून तो म्हणाला, ''राजा प्लवंगच्या आजाराला योग्य औषध शोधून काढण्यासाठी मला तुमची मदत हवी. बक्षीस आपण दोघं अर्धं अर्धं वाटून घेअू.''

चंडीदासने रंजनबद्दल माहिती मिळवली आणि त्याला म्हटले, ''तू अुपासकचा शिष्य ना? ते तर महान् आहेत! खूपसे विद्यार्थी शारीरिक श्रमांना भिअून त्यांच्याकडे शिकायला जायचं टाळतात. पण असं मानलं जातं की, त्यांच्याकडे वैद्यक शिकणाऱ्यांची अुपाय-योजना अचूक असते. मी आपल्या मुलीचं तुझ्याशी लग्न लावून देईन. दोघं मिळून आपण वैद्यकी करू. पाअूस पडेल धनाचा!''

चंडीदासच्या या प्रस्तावावर रंजन खूश तर झालाच. पण मुख्यतः तो राजा प्लवंगच्या रोगाबद्दलच विचार करत होता. त्याने पुन्हा एकदा चंडीदासला त्या रोगाबद्दल विचारले.

''हा एक विचित्र रोग आहे. त्याचं औषध शोधायला माझाही विचार होता. पण वैद्यकशास्त्रात कोणत्याही औषधाचा गुण जाणण्यासाठी प्रयोग करावे लागतात. अशा रोगानं एकादा सामान्य माणूस आजारी असता, तर मी त्याच्यावर प्रयोग करून पाहिला असता. पण इथं तर प्रत्यक्ष राजाशी गाठ आहे! काही चूक घडली तर डोकंच अुडवलं जाईल नं! त्यामुळे त्या दिशेनं काही विचार किंवा कृति करायला कोणी तयारच नाहीय. भलेपणा यातच आहे, की कोणी यासाठी आपली बुद्धी खर्ची घालू नये.'' चंडीदास बोलला.

रंजनने चंडीदासच्या मुलीशी विवाह केला आणि सासरेजावई मिळून वैद्यकी करू लागले. रंजन अुपासकचा एक अुत्तम शिष्य असल्याबद्दलचा चंडीदासने खूप प्रसार केला. त्याची चिकित्सा पद्धत अचूक असल्याचे पसरवले. चंडीदासने अुपासकची एक भली मोठी तसबीर आपल्या घरात लटकावली. अन् त्याच्या महानतेबद्दल येणाऱ्या प्रत्येक रोग्याशी बोलू लागला. त्या तसबिरीला प्रणाम करूनच दोघे कामाला सुरुवात करत.

रंजन 'अुपासकचा शिष्य' म्हणून प्रसिद्ध झाला. त्याची रोग-चिकित्सा सफल होत राहिली. त्यामुळे रोगी त्याच्यावर नेहमी प्रसन्न रहात. त्याची प्राप्तीही वाढू लागली. वर्षाच्या



आतच तो एक लाख अशर्फ्या जमवू शकला.

मधल्या काळात भंजनही आपल्या गावी पवनगिरीला पोचला. त्यावेळी त्याच्या घराजवळच्याच नन्दन नावाच्या तरुणाला भुताने झपाटले होते. प्रवाल नावाच्या एका भूतवैद्याला त्याच्या अुपचारासाठी बोलावण्यात आले. विषय कळल्यानन्तर भंजन नन्दनच्या मातापित्यांना म्हणाला, ''तुमच्या मुलाला भूतबीत काहीही लागलेलं नाहीय. काही रसायनांमुळे त्याची बुद्धी या स्थितीत आलेली आहे. त्या प्रभावामुळे त्याची वागणुक अशी घडत आहे. आवश्यक ती औषधयोजना करून एका आठवड्यातच मी त्याला खडखडीत बरा करीन पहा. तो पुन्हा अगदी सामान्य माणूस बनून जाईल!'' पण नन्दनच्या मातापित्यांनी त्याच्यावर विश्वास

ठेवला नाही. त्यांनी प्रवालला हे बोलणे सांगून त्याचा सल्ला विचारला. भयंकर गर्जना करून प्रवाल म्हणाला, "कालभैरव चिडतो आहे पहा! तो कोण वाचाळ आहे, त्याला पाठवा माझ्याकडे."

भंजन आणि प्रवाल दोघंही भेटले. थोडा वेळ त्यांच्यात काही वाद झाला. भंजन बुद्धिशाली असून तो मांडत असलेले मुद्दे खरे असल्याचे प्रवालने ओळखले. तो गोड आवाजात म्हणाला, "असं पहा, सामान्य वैद्यापेक्षा भूत-वैद्याची कमाई जास्त असते. पण खरी गोष्ट म्हणजे या वैद्यकामुळे बऱ्या होणाऱ्या रोग्यांची संख्या नगण्य असते. आपण दोघांनी एकत्रपणे रोग्यांची चिकित्सा केली तर आपल्या जोडीपुढे बाकी सारे वैद्य टिकूच शकणार नाहीत. मी आपल्या मुलीचं तुझ्याशी लग्न लावून देतो. सासरे-जावई मिळून हा व्यवसाय संभाळू."

या अुपाय भंजनलाही आवडला. प्रवालचा प्रभाव आणि मोठेपणा भंजनने कबूल केला, अन् त्याचा शिष्य बनला. एका आठवड्यातच चंदन खडखडीत बरा झाला. त्यामुळे अन्य लोकांचाही या गुरुशिष्यांवर विश्वास बसू लागला.

दोघे एक झाल्यापासून कोणत्याही रोगाला ते 'सध्याच्या हवेचा दोष' असे म्हणून एखाद्या पूजेचा अुपाय सुचवत. त्या निमित्ताने रोग्याकडून ते खूप पैसे मिळवत. पूजेचा प्रसाद म्हणून भंजन औषधे देई; त्यामुळे रोगी बरा होअून जाई. लोकांना वाटे की, भंजनसारखा कोणी वैद्य या पृथ्वीतलावर दुसरा नाहीच! दिवसेंदिवस त्यांच्याकडे येणाऱ्या रोग्यांची संख्या वाढत राहिली.

अशा प्रकारे सहाच महिन्यात भंजनने लाख अशर्फ्या जमवल्या. पण कधीही, कुठेही त्याने 'आपण अुपासकचा शिष्य असल्याचा' अुल्लेख



केला नाही. अुपासकच्या नावामुळे प्रवालचे पितळ अुघडे पडेल म्हणून अुपासकबद्दल त्याने गुप्तता राखली. इतकेच नव्हे तर अुपासकला गुरुदक्षिणाही द्यायची त्याची इच्छा नव्हती. आपण अुपासकचा शिष्य असल्याचे लोकांना कळू नये अशी त्याची इच्छा होती. भंजनची प्राप्ती अुत्तम असली, तरी पवनगिरीत त्याच्या नावाला महत्व नव्हते. बरेचसे लोक त्याला 'मान्त्रिक' मानत.

एका वर्षानन्तर अुपासकने दोन्ही शिष्यांना 'आपण येत असल्याचे' कळवले. त्यांना नक्की दिवस न कळवता प्रथम तो पवनगिरीला पोचला. आणि भंजनबद्दल त्याने पूर्ण माहिती गोळा केली. त्याला समजले की, भंजन भूतवैद्य बनून पैसा मिळवण्याच्या मागे लागला आहे. जरूरीपेक्षा जास्त धन जमवत असून तेच त्याचं एकमात्र अुद्दिष्ट बनलेले आहे. त्याला भेटण्यासाठी अुपासक त्याच्या घरी गेला असता 'आपण घरात नसल्याचे' त्याने खोटेच कळवले. त्याचा सासरा प्रवाल म्हणाला की, "तुमच्या बाबत जावई माझ्याशी कधीच काही बोलला नाही."

"मी भंजनचा गुरु आहे. त्याच्याकडून माझी जी गुरुदक्षिणा येणं होती, त्यापेक्षा अधिकच पोचली मला! त्याला सांगा की मी खूप खूश झालोय." असे सांगून अुपासक तेथून निघून भुवनगिरीला गेला.

रंजनने गुरुदक्षिणेच्या लाख अशर्फ्या त्याला देअू केल्या असता, अुपासक त्याला म्हणाला, "वैद्यकी करून इतक्या थोड्या अवधीत तू अपार धन मिळवलंस. असहाय रोग्यांना लुटूनच हे शक्य होतं. हे धन मला



नको. वैद्यकी करणं हा एक धर्म असतो, ही गोष्ट तू विसरलास. या धर्माची तू पर्वा केली नाहीस. एखाद्या दिवशी चांगल्या मार्गानं धन मिळवून तू मला दक्षिणा देशील अशी अशा मी बाळगतो. तुला गोष्ट सांगायचीय- आपल्या दोन्ही शिष्यांचे जीवनमार्ग मी ओळखून चुकलोय. म्हणूनच राजा प्लवंगची अुपाययोजना मी सहा महिन्यांपूर्वीच सफलतेनं पार पाडलीय. लाख अशर्फ्या कमवायला तुला आता ती वाटही बंद झालीय." तेथून निघून अुपासक गुरुकुलात परतला.

विक्रमराजाला इतकी गोष्ट सांगून वेताळ म्हणाला, "राजा, ईर्ष्या, मत्सर इत्यादी दुर्गुणांच्या आहारी जाणाऱ्यांची वागणूक कधी कधी फार विचित्र घडते. भंजनने तीन वर्षं गुरूकडून विद्या मिळवली. भूत वैद्यकाची

मदत घेऊन त्यानं भरपूर धन मिळवलं. पण आपल्या गुरुचं नावही घेतलं नाही. असल्या विश्वासघातकी भंजनला त्यानं माफी दिली अन् 'अपेक्षेपेक्षा जास्तच गुरुदक्षिणा मिळाली' असं म्हटलं. अन् त्याच अुपासकने रंजनने पुढे केलेली गुरुदक्षिणा नाकारली. तो तर आपल्या गुरूच्या तसबिरीची पूजा करत असे, सर्वांना 'आपण अुपासकचे शिष्य' असल्याचे सांगत असे. तरीही त्याला अुपासकने 'लुटारू' म्हणून त्याची निन्दा केली. भंजनबाबत तो संतुष्ट होता अन् रंजनबाबत असंतुष्ट! गुरुच्या या वागण्याचं आश्चर्य वाटतंय मला! अशी दुटप्पी वागणूक त्याने का केली? माझ्या शंकांचं अुत्तर जाणूनही ते सांगायचं नाकारलंस, तर हे राजा, तुझ्या मस्तकाची छकलं होअून पडतील."

शंकानिरसन करत विक्रमराजा म्हणाला, "अुपासक धनाचा लोभी नव्हे. आपल्या शिष्यांचा सेवा-धर्म पहायची त्याची इच्छा होती. परन्तु 'राजाच्या रोगासाठी आपल्याला औषध शोधायचं आहे' ही गोष्ट रंजन विसरूनच गेला. आपला हा धर्म विसरून तो कसोशीनं पैशांच्या मागे लागला. एका वर्षाच्या आतच त्याने लाखो मिळवले. हा त्याच्या अतिलोभाचा परिणाम! लोकांना वैद्यक समजावायला आणि सन्मान व सत्कारांच्या साह्यानं धन मिळवायला हवं. रोग्यांना सतावून अधिकाधिक धन मिळवणं बरोबर नव्हे! असलं काम वैद्यकशास्त्राला कलंकित करतं, अपमानित करतं. यासाठीच अुपासकने आशा व्यक्त केली की, रंजनने त्या पातळीवर पोचून गौरवप्रद दक्षिणा आपल्या गुरूला द्यावी. आता राहिला भंजनचा प्रश्न! तो तर दुष्टच होता. अत्यन्त पवित्र असं वैद्यक-शास्त्र त्यानं भूतविद्येशी जोडलं. असल्या स्वार्थी अन् धोकेबाजाला अुपासक 'आपला शिष्य' कसा म्हणेल? त्यामुळेच त्याने भंजनला त्याचा सासरा प्रवाल याच्या हस्ते कळवले की, 'मला अपेक्षेपेक्षा जास्त मोठी दक्षिणा प्राप्त झालीय, हे सर्व पाहून स्पष्ट होतं की, अुपासकमधे ईर्ष्या, द्वेष, मत्सर इत्यादी दुर्गुण मुळीच नाहीत."

अशा प्रकारे राजाचे मौन भंग करण्यात सफल झालेला वेताळ पुन्हा प्रेतासह गायब होअून झाडावर जाअून बसला.

आधार - **'वसुधा'ची रचना**





# शाही नगर कलकत्ता

**शब्दांकन : मीरा नायर ▼ चित्रकला : गौतम सेन**




पश्चिम बंगालची राजधानी कलकत्ता हे भारतातील दुसऱ्या क्रमांकाचे मोठे शहर होय. आधुनिक युगात चालू शताब्दीच्या पहिल्या दशकापर्यंत ते भारताची राजधानीही होते. त्याला अनुरूप असेच त्याचे रूप-वैभव होते.

कलकत्त्याचे जनरल पोस्ट ऑफीस हल्ली जिथे आहे, तिथे इंग्रजांनी भारतातला आपला पहिला किल्ला बांधला होता. हा किल्ला १७५६ मधे बंगालचा नबाब सिराजुद्दौला याने अुध्वस्त केला. तथाकथित 'ब्लॅक होल' घटनाही त्याच वेळी घडली होती. असे सांगितले जाते की त्यावेळी १२३ इंग्रजांना ६मी. ४मी. च्या एका कोठडीत बन्द करून ठेवले होते. आणि श्वास कोंडल्यामुळे ते ठार झाले. पोस्ट ऑफिसच्या इमारतीच्या अग्नेय कोपऱ्याला एक काळ्या संगमरवराची एक फरशी लावलेली आहे अन् त्यावर या घटनेची बरोबर जागा दाखवलेली आहे.

यानन्तर इंग्रजांनी गोविन्दपुर येथे नवीन किल्ला बनवला. हा किल्ला जुन्या किल्ल्यापेक्षा जास्त विशाल व दुर्जेय होता. त्याचे नाव इंग्लंडचा राजा तिसरा विल्यम याच्या नावावरून 'फोर्ट विल्यम' असे ठेवण्यात आले. या किल्ल्यावर कधीही कोणत्याही शत्रूने हल्ला केला नाही. ज्यावरून कधी कोणत्याही शत्रूवर बंदूक चालवली गेली नाही, असा हा हिन्दुस्तानातला एकमेव विशाल किल्ला होय.

किल्ल्याच्या चारही बाजूंचे मैदान साफ केले गेले, अशा प्रकारे चार कि.मी. लांब अन् दोन कि.मी. रुंद अशी नेमबाजीच्या सवयीसाठी केलेली रिकामी जागा 'गोळीबार मैदान' म्हणवली जाते. जगात कोणत्याही शहरात इतके मोठे खुले मैदान नाहीय.

सुप्रसिद्ध ईडन गार्डन - जिथे क्रिकेट मॅचेस खेळल्या जातात - या मोठ्या मैदानाचाच एक भाग होय. भारताच्या पहिल्या क्रिकेट क्लबची स्थापना १७९२ मधे या मैदानातच झाली.

रॉयल कलकत्ता गोल्फ क्लब, भारतीय फुटबॉल स्पर्धेत लागोपाठ सर्वात अधिक विजय प्राप्त करणारा 'मोहन बागान फुटबॉल क्लब', व भारताचे सर्वात जास्त लांबीचे रेसकोर्स असणारा 'रॉयल कलकत्ता टर्फ क्लब' हे सर्व या मैदानातच आहे.



**ईडन गार्डन्स**

# कलकत्याची दृश्ये



चौरंगी स्ट्रीट

'चौरंगी स्ट्रीट' ला आता 'जवाहरलाल नेहरू सारणी, असे म्हटले जाते. गॅस बत्तीची व्यवस्था करण्यात आलेला हाच भारतातला पहिला रस्ता (१८५९) होता. चाळीस वर्षांनंतर कलकत्त्याला 'विजेचा प्रकाश मिळणारे पहिले भारतीय शहर' असा मान मिळाला.



शहीद स्मारक

४६ मीटर उंचीचे शहीद स्मारक, खरे तर १८२३ मधे इंग्रज सेनापती डेव्हिड ऑक्टर लोनीच्या स्मृतिप्रीत्यर्थ बनवले गेले होते. खालपासून वरपर्यन्त या मीनारात २२३ पायऱ्या आहेत. ऑक्टरलोमीने नेपाळयुद्धात इंग्रज सेनेचे नेतृत्व केले होते.

नाखोदा मशिदीची निर्मिती १९२६ साली झाली. ही मशीद सम्राट अकबरच्या मकबरच्या (सिकंदरा, आगरा) प्रतिकृति प्रमाणे बनवली असून , ही कलकत्त्यातील सर्वात विशाल मशीद होय. यात एकाच वेळी १०,००० माणसे नमाज पढू शकतात.



नाखोदा मशीद

व्हिक्टोरिया मेमोरियलच्या निर्मितीला १५ वर्षे लागली, आणि ते १९२१ साली पूर्ण झाले. लॉर्ड कर्झनने महाराणी व्हिक्टोरिया (मृत्यु १९०१) च्या स्मृतीप्रीत्यर्थ याची कल्पना केली होती अन् कधी कधी याला 'ब्रिटीश राज्याचा ताजमहाल' असेही म्हटले जाई.

राजस्थानातील मकराना येथील संगमरवराने बांधलेली ही इमारत मैदानाच्या ऐका सीमेवर आहे.



व्हिक्टोरिया मेमोरियल

भारतातला पहिला व आतापर्यंत एकमात्र भुयारी रेल्वे - मार्ग मेट्रो - हा कलकत्त्यातच आहे. १६ कि.मी. चा हा मार्ग टॉलीगंज व दमदम यांना जोडतो.

भुयारी रेल्वेमार्ग



कालीमाता ही कलकत्त्याची अधिष्ठात्री देवता. कालीघाटावर, कालीमंदिरा जवळच स्वर्गीय मदर थेरेसाने सडकेवर मरणाऱ्या अनाथांसाठी पहिले अनाथालय 'निर्मल हृदय' याची स्थापना केली. निळ्या किनारीची सफेत साडी नेसलेल्या, मदरच्या मिशनरीज ऑफ चॅरिटीच्या नन्स शहरातील गरीब वस्त्यांत स्थापलेल्या अनाथालयात सेवाकार्य करत असलेल्या केंव्हाही पहायला मिळतात.



मदर थेरेसा

रायटर बिल्डिंग ही पश्चिम बंगाल सरकारचे सचिवालय आहे. मूलतः ही इमारत ईस्ट इंडिया कंपनीच्या कारकुनांच्या (रायटर्स) रहाण्यासाठी बनवली गेली होती. १८८० साली हिचे नूतनीकरण करण्यात आले होते.





जोडासांकी गल्लीतील ठाकूर परिवाराचे पूर्वापार घर

रवीन्द्रनाथ ठाकूर यांचा जन्म उत्तर कलकत्यातील जोडासांको भवनात झाला होता. त्यांचे देहावसानही तेथेच झाले. रविबाबूना आपले देशवासी प्रेमाने 'गुरुदेव' म्हणत असत. १९१३ मध्ये त्यांना आपली रचना 'गीतांजली' साठी साहित्याचा 'नोबेल पुरस्कार' दिला गेला. नोबेल पुरस्कार मिळवणारे आशियातील ते पहिलेच व्यक्ति होत.

जोडासांको भवनात आज रवीन्द्र भारती विश्व विद्यालय आहे. हे रविबाबूंनी स्थापलेल्या विश्वभारती विश्वविद्यालया पेक्षा (शान्ति निकेतन) निराळे आहे.

अलिपुरमधे 'राष्ट्रीय ग्रन्थागार' आहे. हे ज्या इमारतीत आहे तिला 'बेल्वेडियर' म्हणत असत व ती बंगालच्या गव्हर्नरचे निवासस्थान होती. राष्ट्रीय ग्रंथागार हे देशातील सर्वात मोठे पुस्तकालय होय. यात जवळजवळ २० लाख छापील पुस्तके व हस्तलिखित पोथ्या आहेत. ही सारी पुस्तके ठेवण्यासाठी ५९ कि.मी. लांबीची पोलादी शेल्फस् उपयोगात आणलेली आहेत. सर आशुतोष मुखर्जी यांचा स्वतःचा पुस्तक-संग्रहही यात्र ग्रंथागाराचा एक भाग आहे. जगातील मोठ्या व्यक्तिगत पुस्तक-संग्रहांमधे याची गणती केली जाते.

कलकत्याच्या एका बाजूला सुप्रसिद्ध इमारत आहे - 'मार्बल पॅलेस.' या आलीशान इमारतीची निर्मिती एका सुंदरशा बगीचात राजा राजेन्द्र मल्लिक नावाच्या एका धनवान बंगाली व्यापाऱ्याने केली होती. याचा एक हिस्सा दर्शकांसाठी खुला ठेवलेला असून त्यात राजाच्या कलात्मक वस्तु मांडून ठेवलेल्या आहेत.

राजाचे वंशज आजही याच इमारतीत रहातात व परिवाराच्या परंपरेप्रमाणे दररोज दुपारी गरीबांसाठी अन्नछत्र चालवतात.

मार्बल पॅलेस







# बुद्धिमान बुढ्ढा

**ग्रीस** देशात एक बुढ्ढा अन् त्याची बायको रहात असत. एके दिवशी बुढ्ढा आपल्या बायकोला म्हणाला, "अग, मला पैशांची फार गरज आहे. तू बाजारात जाऊन आपली गाय विकून ये. मी स्वतःच गेलो असतो, पण माझा पाय मुरगळला आहे नं!"

म्हातारी बिचारी गाय हाकत हाकत बाजारात गेली. तीन चोर-ही तिच्या मागोमाग तिच्या नकळत बाजारात पोचले. बुढ्ढी गाय विकायला बाजाराकडे चाललीय हे त्यांनी ओळखले होते. आता गाय स्वस्तात खरीदायचा एक बेत त्यांनी योजला.

एक चोर बुढ्ढीला भेटून म्हणाला, "काय आजीबाई, बकरी विकायला निघालात वाटतं? केवढ्याला देणार?"

"आंधळा आहेस काय? समोर एवढी मोठी गाय असून तिला बकरी म्हणतोयस?" म्हातारीने रागावून विचारले.

चोर डोके हलवत दुःखी आवाजात म्हणाला, "आजी, स्वप्न तर नाही दिसत तुम्हाला? ही बकरीच तर आहे. तीस रुपयांना देऊन टाका मला."

म्हातारीनं हातातल्या छडीनं त्याला एक वार मारले अन् ती पुढे गेली. जरा पुढे गेल्यावर तिला दुसरा चोर भेटला. त्याने विचारले, "कुठे चाललात आजी?"

"बाजारात चाललेय रे नातवा! हिला विकायला तुझ्या आज्यानं पाठवलंय मला!" म्हातारी उत्तरली.

"मी घेतो पंचवीस रुपयांना. देऊन टाक मला." तो दुसरा चोर म्हणाला.

"तुझं डोकं फिरलंय की काय? बुद्धी भ्रष्ट झालीय? ही चांगली धट्टी-कट्टी गाय बकरीच्या किंमतीत विकू?" बुढ्ढीने विचारले.

चोर आश्चर्य दाखवत म्हणाला, "एवढी मोठी झालीयस. दृष्टी कमी होत चाललीय



तुझी! म्हणूनच बकरीला गाय म्हणते आहेस."

"जे असेल, ते असेल! तू आपला रस्ता पकड!" असे म्हणत म्हातारी पुढे निघाली, पण तिचे मन अशान्त होते. सगळेजण गायीला बकरी का म्हणत आहेत हे कळेना तिला!

विचार करत ती आणखी थोडी पुढे गेली, तोच तिसरा चोर तिच्या जवळ येऊन म्हणू लागला, "सासूबाई! विकणार आपली बकरी? वीस रुपयांना घ्यायला तयार आहे मी!"

"शेवटी ही बकरीच आहे तर! काहीतरी जादू झाली असावी असं वाटतंय! गाय घेऊन तर निघाले होते घरून!" म्हातारी पुटपुटत राहिली.

"सासू! काहीतरी झालंय बघ तुला. तुझ्या दृष्टीत, बुद्धीत काही दोष उत्पन्न झालाय. वीस रुपयांना देऊन टाक मला अन् घरी जाऊन हातपाय ताणून झोपून जा." तो तिसरा बोलला.

"एकानं तीस रुपये देऊ केले, तर दुसऱ्याने पंचवीसला मागितली. अन् आता काय विसात विकू? तीस दे आणि चालू लाग!" म्हातारी म्हणाली.

"खरं तर बकरी तीसची नाहीच आहे. तरी घेतो मी ती! म्हातारी आहेस नं! तुला आणखी चालवायचं नाही; थकशील." तिसरा चोर बोलला.

बुढ्ढी आपली गाय तीस रुपयांना विकून घरी परतली. घडले सारे तिने नवऱ्याला सांगितले. चोरांचे वर्णन ऐकताच म्हाताऱ्याने ओळखले की, ते तिघे शेजारगावचेच सैतान आहेत. म्हातारीला तो म्हणाला, "घडलं ते घडलं. पुढे काय करायचं, ते मी पाहून घेतो."

बुढ्ढा बाहेर गेला अन् एकसारखे दोन ससे खरीदून घेऊन आला. एक ससा त्याने टोपलीत बंद करून घरात ठेवला अन् दुसरा आणखी एका टोपलीत बरोबर घेऊन आपल्या बायकोला म्हणाला, "ए धन्नू! आज आपल्याकडे पाहुणे येणार आहेत. मधातल्या चपात्या, खीर अन् गरम गरम बदकाचं मांस तयार ठेव. मी घरी परतल्यावर 'खाणं काय बनवलं आहे?' असं तुला विचारीन. तू सांग की, 'सशानं सांगितलं तसं बनवलंय सगळं!' असे सांगून तिला पुन्हा एकदा सर्व सांगून नीट उत्तर द्यायला बजावून तो निघून गेला.

शेजारगावी पोचता पोचता तीन्ही चोर दारूच्या अड्ड्यावर दारू पिऊन मजा करताना त्याला दिसले. बुढ्ढ्याला पहाताच ते तिघे त्याला म्हणाले, "अरे बुढ्ढ्या! तुझ्या बायकोला गाय अन् बकरीतला फरक ही कळत नाही." ते त्याची चेष्टा करू लागले.

"माझ्या बायकोबद्दलच बोलताय नं? तिची साठी बुद्धी नाठी झालीय. बुद्धी काम नाही करत तिची. पण म्हणून काय झालं? स्वयंपाक करण्यात तिची बरोबरी कोणीच नाही करू शकणार." बुढ्ढा म्हणाला.

एक चोर म्हणाला, "बरं झालं, निदान एक काम तरी नीट येतंय तिला!"

म्हातारा मोठ्या विचारात पडल्याचे नाटक करत पुटपुटू लागला, "आज काय बनवायला सांगू बरं? खीर खावीशी वाटतेय. बदकाचं गरम गरम मास अन् मधातल्या चपात्याही हव्या." हे बोलता बोलता त्याने टोपल्यातला ससा बाहेर काढला अन् म्हणाला, "अरे तू आत्ता लगेच घरी जा अन् आईला सांग की खीर, बदकाचं मास अन् मधातल्या चपात्या तयार ठेव." इतके सांगून त्याने सशाला खाली सोडले. त्याने उड्या मारत कुठेसा सूंबाल्या केला!

"विचित्रच वाटतंय सगळं! तू सांगितलेलं सगळं तो खरंच घरी जाऊन सांगेल का?" चोरांनी विचारले.

"का नाही सांगणार? अगदी एवढासा असल्यापासून पाळलाय मी तो! लहानपणापासूनच बोलायला शिकवलंमी त्याला. विश्वास नसेल, तर माझ्याबरोबर तुम्हीही चला माझ्या घरी जेवायला!" बुढ्ढ्याने त्यांना आमन्त्रण दिले.

तिघेही म्हाताऱ्याबरोबर त्याच्या घरी गेले. बुढ्ढ्याने घरी पोचताच बायकोला विचारले, "झाला स्वयंपाक?"

"होऽ! सशानं सांगितलेलं सगळं



बनवलंय मी.'' ती म्हणाली. तिने चौघांनाही जेवण वाढले. म्हातान्याने सशाला सांगितल्याप्रमाणे सारा स्वयंपाक तयार असलेला पाहून चोर फसले.

तिघे थोडा वेळ आपसात कुजबुजत राहिले अन् शेवटी त्यांनी ससा विकत घेण्याची गोष्ट काढली.

''ससा विकू? छे, ते नाही होणार!'' म्हातारा बोलला. चोर हजार रुपये द्यायला तयार झाले, तरीसुद्धा म्हातारा ढिम्मसुद्धा न बोलता बसून राहिला.

''ते इतका हट्ट करतायत, तर विकून टाका न ससा! पैशांची फार गरज आहे, असं म्हणत होता नं?'' बुढ्ढीने आग्रह केला.

चारी चोर एकमेकांकडे पहात म्हणाले, ''म्हातारबाबा, घाबरायचं कांही कारण नाही.''

शेवटी म्हाताऱ्याने हजार रुपये घेऊन टोपलीसहित दुसरा ससा त्यांच्या हवाली केला.

आपल्या गावी परतताना चोर म्हणाले, ''आता आधी याला आपण आपापल्या घरी पाठवूया. अन् आपल्या बायकांना आपल्या घरी काय स्वयंपाक तयार हवा, हे कळवू.'' त्यांनी एक एक करून सशाला आपली फर्माईश सांगितली अन् सोडून दिले. ससा वेगाने तेथून कुठेतरी पळून गेला.

नंतर तिघेही चोर आपापल्या घरी गेले. ससा आलाच नाही, आणि बुढ्ढ्याने आपल्याला फसवले, हे कळायला त्यांना वेळ लागला नाही. तिघेही त्याच्या घरी जाऊन त्याला शिव्या देऊ लागले.

मोठ्या सहनशीलतेने त्यांच्या शिव्या ऐकल्यावर म्हाताऱ्याने विचारले, ''ससा सोडण्यापूर्वी तुम्ही त्याच्या अंगावरून हात फिरवलात की नाही?''

त्यांनी तसे न केल्याचे कबूल केले.

''बरोबरच आहे! सशाची मुठभर हवा होऊन गेली असली पाहिजे!''

''ससा काय हवेत बदलून जातो का कधी? वेड तर नाही लागलं म्हाताऱ्या?'' चोर रागाने बोलले.

''ऑं? इतक्या मोठ्या गायीचं जर बकरीत रूपान्तर होतं, तर सशाचं हवेत का नाही होणार?'' बुढ्ढ्याने विचारले.

म्हाताऱ्यानं आपला चांगलाच सूड घेतल्याचे चोरांनी ओळखले.



ते इंग्रजांशी लढले - झुंजले

३

## वीर पाण्ड्य कट्टबोम्मन

कथा : मीरा गुप्ता
चित्रकला : गौतम सेन

(अठराव्या शतकात 'पाळ्यक्कार' म्हणवले जाणारे तमिलनाडूतील सामन्त (जमीनदार) मोठे बलवान झाले होते. ते अर्काटच्या नबाबाचे प्रतिनिधी म्हणून नबाबाच्या नावे सारा वसूल करत. त्यांचे किल्ले चांगले मजबूत असून सैन्य लढवय्यांचे असे. सन १७९२ मधे या बाहत्तर पाळयगांमधून सारा वसूल करायचा अधिकार अर्काट नबाबाने ईस्ट इण्डिया कंपनीच्या हाती सोपवला.)













वीर पाण्ड्यला चुचकारून जॅक्सनच्या भेटीला जायला तयार केले गेले. जॅक्सन नेह्ही जिल्ह्याचा कलेक्टर नियुक्त झाला होता. पण...
जैक्सन दूरवर गेले आहेत. तुम्ही त्यांना भेटायला कुर्तालमला जा.
२३ दिवसपर्यंत कट्टबोम्मनला या ठिकाणाहून त्या ठिकाणी जायला लावले गेले.


शेवटी तो जॅक्सनला रामनाथपूरला भेटला.
हां! काय म्हणायचंय तुला?
आता मला जे सांगायचंय ते माझ्या भूमीवर आणि तेही तलवारीनंच सांगेन.


कट्टबोम्मनला जरामुद्धा मान दिला गेला नाही. इतकेच नव्हे, तर बसायलाही सांगितले गेले नाही.


आणि वीर पाण्ड्य रागाने धुमसत निघून गेला.
कैद करा त्याला!


हूं! मोजके लांडगे एका तमिळ वाघाला पकडू शकतील का?
कट्टबोम्मन अन् त्याचे साथीदार हातातल्या तलवारी परजत बाहेर निघून गेले आणि आपल्या किल्ल्यात घुसले.


५ सप्टेंबर १७९९ रोजी मेजर बॅनरमनने पंचालमकुरुचीच्या दुर्गाला वेढा दिला.
मातीच्या भिंती! याला काय किल्ला म्हणायचं?


पण दुसऱ्याच क्षणी....
आऽऽ!
यांचे भाले चांगले लांब अन् तीक्ष्ण आहेत! बरोबर निशाण साधतात ते!
कोण आहे तो तरूण?
कट्टबोम्मनचा भाऊ! ऊमैदुरै! तो मुका अन् बहिरा आहे!


किल्ल्याच्या आत
शत्रूनं आपली एक भिंत फोडलीय, पण आपण त्यांचा हल्ला परतवलाय!
ते परत हल्ला करतील. आपण सावध राहूया.


तरीच पडलेही. इंग्रजी फौजेची नवी कुमक आली आणि किल्ल्यावर तुटून पडली. यावेळी हल्लेखोरांचा जय झाला आणि इंग्रज सैनिक किल्ल्यात घुसले.
वीर पाण्ड्य कुठे आहे?
आपण वाघाची गुहा जिंकली; पण वाघ मात्र निसटला.
वीर पाण्ड्य पळून जाण्यात सफल झाला. पण.....




















# महाभारत

**अ**र्जुन थोडा आणखी पुढे सरसावला अन् त्याने कौरवांवर बाणांचा वर्षाव केला. जोराने आपला शंख फुंकला. तो ध्वनि ऐकून गायी शेपट्या वर उचलून परत फिरून धावू लागल्या. अर्जुन ज्या कामासाठी आला होता, ते पुरे झाले असे वाटत होते. पण तो जेंव्हा दुर्योधनाशी युद्धाला जाऊ लागला, तेंव्हा सारे कौरववीर त्याच्या समोर आले. अर्जुनाने त्याच्यातल्या कर्णाला पाहिले, तेंव्हा त्याने उत्तरला रथ कर्णासमोर न्यायला सांगितले. कर्णाबरोबरचे सारे योद्धे अर्जुनाशी युद्ध करू लागले. अर्जुनाने त्या सर्वांना हरवले; काहींना मारूनही टाकले. युद्ध जास्त अटीतटीचे होऊ लागले. अर्जुनाच्या हातून मरणारांच्यात कर्ण-बंधु शोणही होता. ते पाहून कर्ण भडकला अन् त्यानेही अर्जुनाशी मजबूतपणे युद्ध सुरू केले. अर्जुनाला हेच हवे होते. दोघांमधे घनघोर युद्ध होत असताना बाकी सर्वजण ते पहातच राहिले! बराच वेळ लढल्यावर कर्ण थकला आणि पाठ फिरवून निघून गेला.

कौरवांनी केवळ अर्जुनाच्या युद्धकलेचीच नव्हे, तर उत्तरच्या सारथ्यकलेचीही खूप तारीफ केली.

कर्ण मागे हटल्याबरोबर सर्व कौरव वीरांनी एकाच वेळी अर्जुनावर हल्ला केला. अर्जुनाने त्याच्यातल्या कृपाचार्यांना निवडून रथ त्यांच्यासमोर नेववला. प्रथम त्याने कृपाचार्यांच्या रथाला प्रदक्षिणा घालून मगच रथ समोर आणला. अर्जुनाने शंख फुंकून त्यांच्याशी लढायला आरंभ केला. घनघोर युद्ध झाले अन् शेवटी कृपही पराजित झाले. ते मागे फिरल्याबरोबर द्रोण अर्जुनाशी युद्ध करायला आले. त्यांना विनयाने प्रणाम करून अर्जुन म्हणाला, ''गुरुवर, आम्ही वनवासात अनेक संकटं झेलली; खूप कष्ट काढले.



आम्हावर रागावू नका. प्रथम आपण माझ्यावर बाण चालवा, मगच मी आपणाशी युद्ध करीन.''

त्याच्या इच्छेप्रमाणे द्रोणांनी बाण चालवला अन् नंतर दोघात युद्ध सुरू झाले. खरे तर द्रोणांच्या बरोबरीचा कोणी योद्धा कौरवसेनेत नव्हताच. अर्जुनाने त्यांना बाण वर्षावात बुडवलेले पहाताच कौरवसेनेत हाहाःकार माजला.

द्रोणपुत्र अश्वत्थामाला पित्याची स्थिती पहावेना. तो अर्जुनावर बाण-वर्षाव करू लागला. अश्वत्थामा जेथून बाण सोडत होता, तिकडे अर्जुनाने आता आपला रथ वळवला. अश्वत्थामाने अर्जुनाला बराच वेळ काबूत ठेवायचा प्रयत्न केला; पण शेवटी अर्जुनच जिंकला.

अशा तऱ्हेने अर्जुन कौरवसेनेवर तुटून पडला असता, कर्ण, दुःशासन आदि कित्येकांनी त्याच्याशी पुन्हा युद्ध केले, पण कोणीच त्याच्यासमोर टिकू शकले नाही. ते युद्ध क्षेत्रातून पळून गेले. आता भीष्म युद्धासाठी पुढे आले.

दोघांनी एकमेकांवर अस्त्रांचा प्रयोग केला. बराच वेळ युद्ध चालू राहिले. शेवटी भीष्म बेशुद्ध होऊन रथातच कोसळल्यावर त्यांचा सारथी त्यांना दूर घेऊन गेला.

आता दुर्योधन स्वतः युद्धासाठी पुढे आला. त्यांच्यातही घनघोर युद्ध झाले. अर्जुनाने आपला एक बाण दुर्योधनाच्या छातीत घुसवला. हा घाव सहन न होऊन दुर्योधनाने रथ मागे हटवला. पळणाऱ्या दुर्योधनाला उद्देशून अर्जुनाने खूप टोमणे मारले.

राग येऊन दुर्योधन पुन्हा परत फिरून अर्जुनाशी लढू लागला. त्याच्याबरोबरच बाकीचे कौरव-वीरही पुढे झाले. त्यांच्याशी युद्ध करता-करता अर्जुनाने त्यांच्यावर संमोहनास्त्र टाकले. त्याबरोबर सर्वांची शस्त्रे गळून पडली आणि सर्वजण बेशुद्ध झाले.

आता अर्जुन उत्तरला म्हणाला, ''उत्तर, लगाम सोड. लवकर जाऊन या वीरांच्या पगड्या घेऊन ये. उत्तराला आपल्या बाहुल्यां साठी रंगीबेरंगी वस्त्रं हवी होती नं! आपण छान रंगीबेरंगी वस्त्रं गोळा करूयां. त्यात बघ कृपाचार्यांची पगडी सफेत आहे; कर्णाची हिरवी, दुर्योधन आणि अश्वत्थामा यांच्या पगड्या निळ्या आहेत. घेऊन ये त्या सगळ्या ! पण मी टाकलेल्या अस्त्राने



भीष्मांवर काहीही परिणाम झालेला नाही, कधी होणारही नाही. कारण त्यांना तोडगा माहीत आहे. त्यांच्याजवळ जाऊच नको तू ! ते चांगले सावध आहेत नक्की अन् त्यांचा अपमानही होऊनये.''

उत्तर पगड्या घेऊन ताबडतोब रथावर चढला. तो जेंव्हा या सैन्यामधून जाऊ लागला, तेंव्हा भीष्मांनी अर्जुनावर बाण फेकून अर्जुनाला अडवले. अर्जुनाने भीष्मांच्या रथाचे घोडे मारून टाकून त्यांचा बाण-वर्षाव थांबवला.

इतक्यात दुर्योधन सावध झाला निश्चिन्तपणे जाणाऱ्या त्याला पाहून दुर्योधन आपल्या योध्यांना म्हणाला, ''याला असा जाऊ का देताय? पहा, तो आपल्या हातून वाचून परत जाऊ नये.''

भीष्म म्हणाले, ''अरे, तुझी अक्कल चरायला गेली आहे का? सर्वांची अस्त्रं हातातून गळून पडून ते बेशुद्ध झाले, तेंव्हा अर्जुन सर्वांना मारून टाकू शकला असता. पण त्यानं तसं न करता तुम्हा सर्वांच्या फक्त पगड्याच काढून नेल्या. झाला तेवढा अपमान पुरे. आता आपला पराजय कबूल कर, अन् त्याला गायी घेऊन जाऊ दे.''

भीष्मांच्या आज्ञेवरून आपला पराजय स्वीकारून कौरवांनी परत जायचे ठरवले. त्यांना परत जाताना पाहून अर्जुनाला फार आनन्द झाला. त्याने भीष्म, द्रोण, कृप अश्वत्थामा आणि अन्य कौरवीरांकडे आपले नमस्कार बाण टाकून आपली कृतज्ञता दर्शवली. शेवटी दुर्योधनावर एक बाण सोडून त्याने त्याचा मुकुटच उडवला!



नंतर अर्जुन उत्तरला म्हणाला, ''शत्रूंचे प्राण कंठाशी आणले! त्यांना चांगलंच लोळवलं आपण. गोधनाचं रक्षणही केलं. आता परत जाऊया.''

रथ पुन्हा एकदा शमीवृक्षाजवळ थांबला. पांडवांची अस्त्रे पुन्हा वर ठेवण्यात आली. आता अर्जुन सारथ्याच्या जागी बसला. अन् म्हणाला, ''पांडव आजवर त्यांच्याच आश्रयाला राहिले, असं तुझ्या पित्याला कळलं, तर घाबरे होतील ते. म्हणून त्यांना सांग की, तूच कौरवांचा दणदणीत पराभव केलास; जोरदार युद्ध केलंस.''

''महानुभाव, असं युद्ध माझ्यासारख्या सामान्याच्या हातून होणे नाही! तरीही जोवर आपण अनुमती देणार नाही, तोवर हे रहस्य



रहस्यच राहील. युद्ध मीच जिंकलं. असं सांगेन सर्वांना.'' अुत्तरने कबूल केले.

''आपण थोडा वेळ इथेच आराम करू. घोड्यांना पाणी पाजू अन् मध्यान्हानन्तर नगरात परतू. मधल्या वेळात पशुपालकांना नगरात पाठवून आपल्या पित्याला निरोप दे की, युद्ध तूच जिंकलंस.'' अर्जुनाने अुत्तरला सल्ला दिला. इकडे सुशर्माला हरवून विराटराजा नगरात परतला. दरबारातल्या प्रमुख व्यक्तींनी आणि ब्राह्मणांनी त्याचे अभिनन्दन केले.

विराटने अुत्तरची चौकशी केल्यावर, त्याला अंतःपुरातल्या स्त्रियांकडून समजले की, कौरव गोधन पळवून घेअून गेले. गायी सोडवून आणण्यासाठी अुत्तर गेलेला असून बृहन्नडाही त्याच्या मदतीसाठी बरोबर गेली आहे.

ही बातमी ऐकून विराट घाबरला, तो मन्त्र्यांना म्हणाला, ''सुशर्माशी युद्ध संपल्यावर जेवढे सैनिक अुरलेत, त्या सार्‍यांना अुत्तरच्या मदतीसाठी पाठवा. एका नपुंसकाला सारथी बनवून माझा पुत्र गेला आहे. तो जिवन्त तरी असेल की नाही कोण जाणे! प्रथम नीट माहिती मिळवा.''

विराटची अवस्था पाहून धर्मराज हसत म्हणाला, ''बृहन्नडा सारथी असताना आपल्या पुत्राच्या केसालाही धक्का लावायचं साहस कोणी करू शकणार नाही. तो विजयी होअूनच परतेल. आपण निश्चिन्त रहावं. कौरवसेनाच काय, पण प्रत्यक्ष देव-असुरांची सेनाही घाबरून पळून जाईल! त्याच्यापुढे टिकणारच नाही.''

इतक्यात अुत्तर जिंकल्याची अन् कौरवांपासून गायी सोडवल्याची बातमी पोचली. धर्मराज म्हणाला, ''अुत्तरचं सकुशल पोचणं हा शुभसमाचार होय. बृहन्नडा सारथी असताना जिंकणं, ही माझ्या दृष्टीनं आश्चर्याची गोष्ट नव्हे!''

पुत्राच्या विजयाच्या बातमीने विराटला असीम आनन्द झाला. बातमी देणार्‍याला त्याने सुवर्णवस्त्र लपेटले आणि राजमार्ग सजवून मंगलवाद्यांच्या गजरात अुत्तरचे स्वागत करायची आज्ञा दिली. नंतर सैरन्ध्रीला तो म्हणाला, ''जा फासे घेअून ये. कंकशी द्यूत खेळायचंय मला!''

दोघे द्यूत खेळायला बसले. तेंव्हा विराट कंकला म्हणाला, ''पाहिलंस कंकभट! माझ्या पुत्राने किती महावीरांना एकट्यानेच तोंड दिलं आणि त्यांना पराजित केलं! यापेक्षा अधिक मला काय हवं!''

धर्मराज यावर म्हणाला, ''बृहन्नडा सारथी असताना, का नाही जिंकणार?''

विराटला त्याच्या बोलण्याचा राग आला. धर्मराजला तो म्हणाला, ''अरे अधम ब्राह्मणा! तो नपुंसक कुठे, अन् माझा अुत्तर कुठे! त्यांच्यात कसलं साम्य? तुझं इतकं साहस? काय बोलावं अन् काय नाही, इतकंही कळत नाही तुला? आत्ता एक वार यासाठी क्षमा करतो मी तुला. पण पुन्हा एकदा असलं धाडस केलंस, तर तुझे प्राणच घेअून जातील पहा!''

तरीही धर्मराज शान्तिपूर्वक म्हणाला, ''भीष्म, द्रोण, अश्वत्थामा, कर्ण, कृपाचार्य यांच्यासारखे महायोद्धे कौरवांकडे आहेत. अशा योध्यांनी युक्त सेनेला इन्द्रही हरवू शकणार नाही. त्यांना हरवायची शक्ती फक्त बृहन्नडेतच आहे. अशी अद्भुत पराक्रमी बृहन्नडा बरोबर असताना आपल्या पुत्रानं युद्ध जिंकलं तर ते आश्चर्यजनक नव्हेच. तिच्यामुळेच तो इतक्या वीरांना जिंकू शकला.''

अतिशय क्रोधित होअून आता मात्र विराट ओरडला, ''पुन्हा तेच बोललास?'' अन् त्याने हातातले फासे त्याच्याकडे फेकले. ते नाकाला लागून कंकला झालेल्या जखमेतून रक्त वाहू लागले. ते खाली सांडण्यापूर्वीच द्रौपदीने ते आपल्या ओंजळीत धरले. नंतर धर्मराजचा अुद्देश ध्यानी घेअून ती एक सोन्याचे पात्र घेअून आली. आता रक्त त्यात सांडू लागले.



इतक्यात द्वारपालांची ललकारी आली की, अुत्तर व बृहन्नडा प्रवेश करत आहेत.

''त्या दोघांना भेटायला आतुर आहे मी. तावडतोब आत घेअून या त्यांना.'' विराट द्वारपालाला म्हणाला.

धर्मराजने हळूच द्वारपालाला सुचवले, ''बृहन्नडेला आणू नकोस. फक्त अुत्तरच आत येअू दे. बृहन्नडेनं शपथ घेतली आहे की, 'युद्धभूमीशिवाय मला कोणी, कुठेही जख्मी केलं, तर त्यांना मारून टाकीन!'' माझं वहातं रक्त दिसलं तर तुमचा राजा आपल्या परिवारासह इथेच मारला जाईल!''

नंतर केवळ अुत्तरच विराटजवळ आला अन् पदस्पर्श करून त्याने पित्याला नमस्कार केला. नंतर धर्मराजच्याही पावलांना स्पर्श करून त्याने नमस्कार केला. त्याच्या

नाकातून वहाणारे रक्त पाहून अुत्तरला फार वाईट वाटले. त्याने विचारले, ''कोणी यांना जखमी केलं? असलं घाणेरडं काम कुणाचं?''

''हा वेडा, असमंजस तुझी प्रशंसा न करता त्या नपुसंकाची स्तुतिस्तोत्रं गात राहिला. रागावून मीच जखमी केलंय याला!'' विराट म्हणाला.

''केवढी मोठी चूक झाली तात आपल्या हातून! यांच्या क्रोधानं आपण भस्म होण्यापूर्वी यांची क्षमा मागा!'' अुत्तरने पित्याला विनवले.

पुत्राच्या सांगण्यावरून विराटने कंकजवळ क्षमा मागितली. धर्मराज म्हणाला, ''राजा, माझा राग केंव्हाच शान्त झाला! माझं रक्त जमिनीवर सांडलं असतं, तर मात्र देशाचं अहित झालं असतं. मला त्याचीच मोठी काळजी पडली होती!''

धर्मराजच्या नाकातून रक्त वहाणे बन्द झाले. थोड्या वेळाने अुत्तर बृहन्नडेला घेअून आत आला. आल्याबरोबर बृहन्नडेने विराटराजा व कंकभटाला हात जोडून नमस्कार केला.

बृहन्नडेनेही ऐकावे म्हणून विराट काहीशा मोठ्या आवाजात अुत्तरला म्हणाला, ''अुत्तर, तू खरोखरच माझ्यायोग्य पुत्र आहेस. तुझ्यासारखे शूर वीर विरळाच असतात. कर्णासारख्या पराक्रमी वीराशी तू कसा लढलास? भीष्मासारख्या योध्यावर जय कसा मिळवलास? द्रोण अन् त्यांचा पुत्र अश्वत्थामा महाशूर आहेत; त्यांच्या बाणांसमोर कसा टिकलास तू? कृपाचार्यांचं नाव ऐकताच मोठे वीरही थरथर कापू लागतात. अशा सर्व महान् वीरांशी लढून विजय मिळवलास तू! आपल्या गायीही सोडवून आणल्यास! मी किती प्रसन्न आहे, तुला कसं कळणार? तुझी वीरता इतिहासाच्या पानांवर सुवर्णक्षरांनी लिहिली जाईल.''

पित्याचे गौरवोद्गार ऐकून अुत्तर दबल्या आवाजात म्हणाला, ''गोधन मी नाही सोडवलं तात! शत्रूंनाही मी नाही हरवलं! कोणा देवानंच हे सारं केलं. शत्रूला पाहूनच पळून जाणाऱ्या मला त्यांनी अडवलं अन् माझ्या रथात बसले. मला सारथी बनवून त्यांनीच युद्ध जिंकलं. **क्रमशः**



# ‘चान्दोबा’ च्या बातम्या

**विजेचा धक्का कसा असतो, माहीत आहे?**

मुलांना विजेजवळ, विजेच्या साधनांजवळ आपण जाऊ देत नाही. आणि सावधगिरी बाळगतो; कारण धक्का लागायचा संभव असतो. त्यांना विजेजवळ जाऊ देणं म्हणजे प्राणांशी खेळ



करू देण्यासारखे होईल. परन्तु केरळच्या क्विलॉनमधे रहाणाऱ्या राजमोहनची गोष्टच निराळी. त्याला विजेचा धक्का म्हणजे खेळच वाटतो. तेरा वर्षांचा किशोर असताना, त्याला एकाएकी जीवनाबद्दल विरक्ती वाटली. मरण्याच्या उद्देशाने विजेच्या खांबावर चढून त्याने जिवन्त तारेला स्पर्श केला. आश्चर्य घडले! त्याला काहीच झाले नाही! तारेला स्पर्श करूनही आपण मेलो नाही हे त्याने जाणले. लवकरच त्याला कळून चुकले की विजेच्या प्रवाहाचा आपल्या शरीरावर काहीच परिणाम होत नाही. नंतर त्याने या प्रकाराचा अर्थार्जनासाठी उपयोग करून घेतला. आपले सामर्थ्य प्रदर्शित करून तो आपले पोट भरत असतो. आपल्या उघड्या शरीरावर इन्सुलेशनविरहित तारा बांधून जवळजवळ ३०,००० व्होल्टस् शक्तीची वीज त्यातून प्रवाहित करतो. ‘टेस्टर’ वरून कळू शकते की त्यातून ठिणग्या निघतात, पण राजमोहनवर मात्र काहीच परिणाम होत नाही. १९८६ मधे ‘वर्ल्ड सायन्स अ‍ॅण्ड टेकनिकल इन्स्टिट्यूट ऑफ इण्डियाने’ त्याची परीक्षा केली. राजमोहनच्या शारीरिक तत्वांवर इन्स्टिट्यूट काहीही प्रकाश टाकू शकली नाही. हा ‘काय चमत्कार आहे’ हे ते सिद्ध करू शकले नाहीत. सध्या तो ‘करंट मोहन’ नावाने प्रसिद्ध आहे. १९९२ मधे ‘गिनीज बुक ऑफ वर्ल्ड रेकॉर्ड्‌स्’ मधे त्याचे नाव दाखल झाले आहे.

**सोन्याचे हृदय**

पंजाबच्या नरेन्द्रचे हृदय सोन्याचे आहे! दिल्लीच्या इस्पितळात हृदयाच्या उपचारासाठी तो दाखल झाला. त्याच्या धमन्यांमधे जे अडथळे होते. ते दूर करायचे होते. त्यासाठी डॉक्टरांनी २४ कॅरट सोन्याच्या ‘वायर मॅश’ चा उपयोग केला. त्याचे वजन एक ग्रॅमपेक्षाही कमी आहे. त्यातून त्याच्या हृदयाला रक्त पुरवठा होऊ शकतो. सामान्यतः यासाठी ‘स्टेनलेसस्टील’ चा उपयोग केला जातो. पण यावेळी जगात प्रथमच ‘गोल्ड मॅश’ चा उपयोग केला गेला. डॉक्टरांचे म्हणणे असे की, हे मॅश ‘स्टेनलेसस्टील’ पेक्षा अधिक चांगले आहे!

चांदोबा पुरवणी १०९



आपल्या देशाची सौन्दर्यस्थळे

# भरतपूरचे पक्षी अभयारण्य





भरतपुर हे एक ऐतिहासिक नगर असून दिल्लीपासून ते १८० कि.मी. दूर आहे. अठराव्या शतकात बांधलेला एक किल्लाही येथे आहे. या शहराजवळच २९ कि.मी. पर्यन्त पसरलेले, जमिनीत खूप ओल व दमट हवा असणारे ‘केलदेव नॅशनल पार्क’ आहे. पक्षी अभयारण्यही इथेच आहे. ते पहाण्यासाठी कित्येक पर्यटक येथे येतात.

इथे एक मन्दिर आहे. या मन्दिराच्या नावानेच पार्कलेही नाव पडले आहे. ओलभरल्या या जमिनीवर धनदाट झाडी, तलाव, झरे, जंगलात आढळणारे विशाल वृक्ष आणि त्या वृक्षांमधे सडून पडलेले ओंडके आहेत. यामुळे अंडी घालण्यासाठी पक्ष्यांना ही जागा सुरक्षित वाटते. यामुळेच तऱ्हेतऱ्हेचे पक्षी आकर्षित होऊन इथे येतात. इथे जवळजवळ ३२८ जातींचे पक्षी आहेत. उत्तर सैबेरिया, चीन आदि दूर देशांतूनही पक्षी इथे येतात. यापैकी सैबेरियातील बगळे फारच आकर्षक असतात.

हे जंगल प्रथमतः भरतपुर महाराजांचे शिकारीचे केन्द्र होते. पण १९६४ मधे इथे शिकार करण्यावर प्रतिबंध केला गेला. हा एक ‘सुरक्षित भाग’ म्हणून जाहीर केला जावा अशी सरकारकडे मागणी करण्यात आली. पक्षी निरीक्षक व पक्षी प्रेमी लोकांसाठी अंतरराष्ट्रीय स्तरावरचा ‘पक्ष्यांचा स्वर्ग’ म्हणून भरतपुर प्रसिद्ध झाले. अभयारण्यातील तलाव व झरे यात रहाणारे किंवा उडणारे पक्षी जवळून पहाण्यासाठी येथे लहान-लहान नावांची सोय करण्यात आली आहे. आत काही भागात सायकली व सायकल-रिक्शाही चालवण्याची परवानगी आहे. इथे पक्षीच नव्हेत, तर हरीण, जंगली डुकरे, मोर आदिही आहेत. कधी कधी अजगरांसारखे मोठे सर्पही आढळतात.

पुराणकाळातील राजे :

# धर्मगुप्त

चंद्रवंशाचा राजा धर्मगुप्त शिकारीसाठी गेला. संध्याकाळपर्यंत तो शिकार करत राहिला. बरोबरच्या लोकांपासून भरकटून तो दूर झाला, अंधार झालेला होता अन् रस्ता दिसत नव्हता. आपण कुठे आहोत हे त्याला स्वतःलाही कळेना. रानटी जनावरांपासून स्वतःला वाचवण्यासाठी तो एका झाडावर चढला.

तो झाडावर चढण्यापूर्वी तेथे एक अस्वल बसलेले होते. धर्मगुप्तला पहाताच ते म्हणाले, ''राजा, आज रात्री आपल्याला सिंहापासून बचाव करायचा आहे. तू खूप थकला आहेस असं दिसतंय. मध्यरात्रीपर्यन्त तू झोप आधी. मी तोपर्यन्त जागा राहीन; तुझं रक्षण करीन. तू जागा झालास, की मी झोपेन. तेंव्हा तू माझं रक्षण करशील?''

राजाने अस्वलाची अट कबूल केली आणि डहाळ्या पकडून झोपायच्या तयारीला लागला.

थोड्या वेळाने एक सिंह तेथे आला आणि झाडावर बसलेल्या अस्वलाला म्हणाला, ''मित्रा, तू त्या माणसाला खाली पाडलंस, तर त्याला खाऊन मी आपलं पोट भरीन. मग तुला मी कसलाही त्रास नाही देणार!''

पण अस्वलाने सिंहाला नकार दिला. सिंह तेथून निघून गेला.

मध्यरात्रीनन्तर राजा जागा झाला आणि अस्वल झोपून गेले.

थोड्या वेळाने सिंह पुन्हा तिथे येऊन राजाला म्हणाला, ''हे मानवा, तू या अस्वलाला खाली ढकल. तसं केलंस, तर तुला मी त्रास नाही देणार.''

राजाने दुसऱ्याच क्षणी अस्वलाला खाली ढकलले. ते बिचारे धडपडून जागे झाले अन् त्याने खालच्या फान्दीला घट्ट पकडून स्वतःला वाचवले. ते राजाला म्हणाले, ''इतका विश्वासघात? इतकी कृतघ्नता? मी तुला शाप देतो, की तू वेडा हो!''

खरोखरच धर्मगुप्तची मति भ्रष्ट झाली. दीर्घकाळपर्यन्त त्याने अनेक कष्ट अुपसले. आपल्या चुकीबद्दल त्याला पश्चात्ताप झाला. जैमिनी मुनींच्या कृपेने पवित्र तीर्थामधे स्नान केल्यावर तो पुन्हा पूर्ववत् सामान्य माणूस बनला.

कृतघ्नतेपेक्षा मोठे पापकृत्य दुसरे नाही. धर्मगुप्तची गोष्ट याचे अुदाहरण आहे.



## तुम्हाला माहीत आहे काय?

### टोप्या

अुन्ह व थंडी यांपासून स्वतःचे रक्षण करण्यासाठी टोपीचा अुपयोग होतो. अन्यथा हल्ली टोपीचा अुपयोग कमीच होत चाललाय. १९४० पर्यन्त शहरांमधे कोणाला घराबाहेर जायचे, तर टोपी घालूनच जात असत. पण आजमात्र टोपीचे अस्तित्व, गणवेषाचे एक अविभाज्य अंग म्हणूनच अुरले आहे. धर्मकृत्यांचे वेळी आवश्यक म्हणून आजही टोपीचा अुपयोग केला जातो. 'रशियन फर हॅट' घातल्यामुळे शरीरातील अुष्णता कमी होत नाही. थंड हवेच्या सपकाऱ्यापासून ही टोपी कानांचे रक्षण करते. 'स्पॅनिश सांब्रिटो' टोपीचा पुढला भाग चेहऱ्यावर अुन्ह पडू देत नाही. आणि गरम हवेपासून डोळ्यांचे रक्षण करते व डोकेही थंड ठेवते. ही एक प्रकारच्या तंतूंपासून बनवलेली असल्यामुळे थंडीपासूनही रक्षण करते. अुत्तर अमेरिकेच्या रेड इण्डियन्सची टोपी मोठी सुन्दर दिसते अन् अधिकाराचे चिन्ह वाटते. नायक मोठी टोपी वापरतो. बिशपच्या टोप्या कमानदार असतात (आर्च आकाराच्या) त्या त्यांचा हुद्दा व मोठेपणाचे चिन्ह असतात. इजिप्तमधे अुष्णतेपासून स्वतःला वाचवण्यासाठी व राष्ट्रीय वेष म्हणून टोपी धारण केली जाते.




### इंद्रधनुष

## नैसर्गिक अनुरूपता



नैसर्गिक अनुरूपतेचे सुंदर अुदाहरण म्हणजे फुलपाखरू. फुलपाखराच्या मधोमध एक काल्पनिक रेषा काढली, तर आपल्या ध्यानात येईल की त्याच्या एका बाजूच्या अवयवांचे प्रमाण व आकार अगदी दुसऱ्या बाजूसारखाच (सिमेट्रिकल) आहे! दोन्हीत थोडासुद्धा फरक दिसत नाही. अशा प्रकारे अवयव एकमेकांसमोर एकाच प्रमाणात व आकारात असतील तर याला अवयव अनुरूपता (सिमेट्री) असे म्हणतात. विभाजन रेषेला अनुरूप रेषा म्हणतात. मानवशरीरही याच श्रेणीत येते. शिल्पशास्त्रातही अनुरूपता हे प्रमुख लक्षण असते. या शैलीचा युरोपमधे पुनरुज्जीवन कालात पुनरुद्धार झाला. १७,१८ शताब्दीत व १९ व्याच्या आरंभाला शैलीचे खूप प्राचुर्य होते.

### स्वातन्त्र्याच्या सुवर्णजयन्तीनिमित्त 'चान्दोबा' ची भेट

# पहिला स्वातन्त्र्य-संग्राम



(ब्रिटिश ईस्ट इण्डिया कंपनीचे गव्हर्नर जनरल डलहौसी यांनी जाहीर केले की स्थानिक शासकांना (संस्थानिकांना) मूल दत्तक घेण्याचा मुळीच अधिकार नाही. या जाहीरनाम्याप्रमाणे असेही कळवले गेले की, ज्यांना स्वतःचे मूल नाही, अशांचे राज्य कंपनी खालसा करून स्वतःच्या ताब्यात घेईल. त्यांच्या या जाहीरनाम्यामुळे झाशी राणी व नानासाहेब पेशवे यांचे राजोचित स्थान नाहीसे झाले. अशातच संपूर्ण देशातील हजारो शिपाई गोऱ्यांच्या अधिकाराविरुद्ध बंडाला तयार झाले. बरॅकपुरचा शिपाई मंगल पांडे याने गोऱ्यांना ठामपणे विरोध दर्शवला. सर्वच्या सर्व शिपायांनी सर्वत्र एकाच वेळी बंड पुकारावे अशी योजना नानासाहेब करत होते. पण झाशी-राणी नानासाहेबांना भेटायला गेली तेव्हा त्यांना बातमी मिळाली की, मिरतचे शिपाई बंडाचा झेंडा रोवून चुकले आहेत.) या नंतर

**मि**रतमधे ब्रिटीश शिपायांना मारल्यानन्तर शिपायांनी उत्साहाने दिल्लीकडे कूच केले. दिल्लीच्या रक्षणासाठी तैनात केलेल्या ब्रिटीश शिपायांना त्यांनी हरवले व मोगलांचा वारस बहादुरशहा याला 'हिन्दुस्तानचा सम्राट' म्हणून जाहीर केले. यापूर्वी बहादुरशहाचे सर्व अधिकार काढून घेतले गेले होते.

या सर्व घटना कळल्यावर झाशीची राणी लक्ष्मीबाई नानासाहेबांना म्हणाली, "दादा, मिरतच्या त्या धैर्यशाली युवकांचे साहसकार्य पाहिल्यानंतरही आता आपण गप्प रहाणे उचित नव्हे. त्यांच्या मार्गदर्शनासाठी तर कोणी नेताही नव्हता. साहसी म्हणून प्रख्यात आहात. विश्वासपात्र असे काही साथीदार बरोबर घेऊन तुम्हीही असं काही कार्य आत्ता केलेत, तर देश तुमचा ऋणी होईल."

"तू बरोबर बोललीस मनु! आपल्याला देशाच्या कल्याणासाठी भरदार पावलं उचलायला हवीत. सर्व देशभक्तांनी या महायज्ञात सहभागी व्हायला हवे. ही तर परमेश्वरी योजनाच दिसतेय. तू आता निश्चिन्त मनानं परत जा."

राणी लक्ष्मीबाई झाशीकडे निघाली. तिच्याबरोबर काही अंगरक्षक होतेच. परन्तु नानासाहेब पेशव्यांनी दूरदृष्टी राखून रक्षणासाठी आणखी काही शिपाईही तिच्यासमवेत पाठवले.

मिरतच्या बंडानन्तर ब्रिटीश अधिकाऱ्यांनी स्थानिक लोकांच्या हालचालींवर व त्यांच्या कार्यांवर कडक नजर ठेवली. त्यावेळी कानपुरमधे व्हिलर नावाचा एक इंग्रज सैनिक काही दलांचा दलपती होता. 'सैनिकांनी विद्रोह केला, तर आपण आम्हाला मदत करायला तयार आहात का?' अशी विचारणा करणारे एक पत्र व्हिलरने नानासाहेबांकडे रवाना केले. एक काळ असा होता की, नानासाहेब त्यांच्या बाजूने मदत करत असत. पण यावेळी मात्र त्यांनी उत्तरादाखल आपल्या पत्रात लिहिले की, "अशी परिस्थिती उद्भवली तर आपण अशा ठिकाणी निघून जा, की जिथे आपले लोक अधिक संख्येने वास्तव्य करून आहेत."

परन्तु व्हिलरने या सल्ल्याची मुळीच पर्वा केली नाही. बाकीचे अधिकारी स्थानिक लोकांशी फारच निर्दयपणे वागू लागले. त्यांना पहिल्यापेक्षाही जास्त त्रास देऊ लागले, आपला अधिक प्रभाव दाखवू लागले. त्यांना फार वाईट वागणूक देऊ लागले. बारीकशा चुकीबद्दलही त्यांना ते अति कडक शिक्षा देऊ लागले. मारपीट करू लागले. त्यांच्या या वर्तणुकीमुळे स्थानिक लोक फार दुःखी झाले. पण सारा अत्याचार मुकाट्याने सहन करत राहिले. त्यांनी आपले दुःख प्रकट होऊ दिले नाही. तरीही काही लोक विरोध दर्शवत





असत. अशा एका प्रमुख विद्रोही माणसाने एकदा म्हटले, ''लोकहो, आपल्या पेशव्यांचा अधिकार बहुतेक काढून घेतला गेला असावा. पण फक्त एवढंच केल्यानं तुम्हाला काय असं वाटतं का, की त्यांच्याबद्दलची आपली आदराची भावना कमी होईल? तुम्हाला हे शक्यच नाही होणार!''

व्हिलरने यावेळी दूरदृष्टीने एक काम केले. कानपुरमधे त्याने एक किल्ला बांधून घेतला. तो त्याने जमेल तिका मोठा अन् खूप वेगाने बनवून घेतला. उद्देश असा की - कानपुरमधे असणारे सारे ब्रिटीश परिवार किल्ल्यात सुरक्षित राहू शकतील अन् त्यांच्यासाठी आवश्यक त्या सर्व खाद्यपदार्थांचा भरपूर साठा करून ठेवता येईल. त्यांच्या रक्षणासाठी दारूगोळ्याचीही व्यवस्था करता येईल.

परंतु इतक्यात आपत्ती कोसळेल अशी व्हिलरने कल्पनाच केली नव्हती. नानासाहेबांचे मित्र तात्या टोपे, मन्त्री अजमुल्लाखान व काही देशभक्तांनी गोऱ्यांच्या नजरेपासून स्वतःला दूर ठेवून एका विस्तृत बंडाची मोठ्या गुप्तपणे योजना ठरवली. हा विद्रोह मोठ्या प्रमाणावर करायचे त्यांनी निश्चित केले. एके दिवशी मध्यरात्रीच्या सुमारास त्यांनी कंपनीच्या खजिन्याला व हत्यारांच्या गोदामाला अचानक वेढा दिला. त्या इमारतीच्या चारी बाजूंना ब्रिटीश सैनिकांचा पहारा होता. दोन्ही बाजूंनी बन्दुका चालवल्या गेल्या. या लढाईत काही बंडखोर मारलेही गेले. पण दोन तासातच इमारत बंडखोरांच्या ताब्यात आली.

व्हिलरने आपली असहायता ओळखली आणि ब्रिटीश कुटुंबांना ताबडतोब नवीन बांधलेल्या किल्ल्यात रवाना केले. ब्रिटीश परिवारांच्या झुंडीच्या झुंडी किल्ल्यात पोचल्या. त्यावेळी बंडखोरांनी त्यांचा रस्ता अडवला नाही. त्यांचे कसल्याही प्रकारचे नुकसान केले नाही. ''आपल्याला नेहमी स्वतःचे व शत्रूचे बळ तोलून पहायला हवे; आणि मगच आपल्या कार्यक्षेत्रात उतरायला पाहिजे. आपलाच विजय होईल अशी पूर्ण खात्री पटली, की मगच हल्ला करायला पाहिजे. मागे, पुढे न पहाताच हल्ला करणं आपल्यालाच नुकसानकारक ठरू शकतं.'' नानासाहेब पेशव्यांच्या या सल्ल्यामुळेच त्यांनी यावेळी युद्ध केले नाही.

ब्रिटीश परिवार सुरक्षितपणे किल्ल्यात पोचल्यानन्तर नानासाहेबांनी व्हिलरला चेतावणी देणारे पत्र लिहिले की, 'आमचे बंडखोर कोणत्याही वेळी तुमच्या कानपुरच्या किल्ल्याला वेढा देऊ शकतील.'

एका साथीदाराने त्यांना विचारले की, ''त्यांना असं अगोदरच सावध करणं आवश्यक आहे का?''

''होय, आवश्यक आहे. ही गोष्ट खरीच की, इंग्रजांनी आपल्या भूमीवर अतिक्रमण केलं, आपलं अधिपत्य जमवलं, आपल्या विरुद्ध कारस्थानं केली, आपल्या विरुद्ध कुमार्ग अवलंबले. पण आपण त्यांच्याविरुद्ध जे युद्ध करणार आहोत, त्याद्वारे त्यांना असं कळायला हवं की, आपण मात्र प्रत्येक पाऊल अगदी उघडपणे उचलत आहोत. काही लपवून ठेवून, किंवा स्वतः लपून राहून आपण कोणतंही काम करू नये. आपण तर समोरासमोर त्यांच्याशी युद्ध करावला तयार आहोत. तेंव्हा त्यांना ही एक संधी दिली, तर त्यात चूक कसली?'' नानासाहेबांनी सर्वांनाच उद्देशून प्रश्नाचे उत्तर दिले.

आता किल्ला घेरला जाऊ लागला. आत तैनात केलेले शिपाई जरी प्रशिक्षण घेतलेले सैनिक असले तरी बंडखोरांना ते तोंड देऊ शकले नाहीत, त्यांच्यासमोर टिकू शकले नाहीत. थोड्याच दिवसात त्यांचा दारूगोळा संपुष्टात आला नंतर खाद्य-पदार्थ संपत आले. शेवटी तर पिण्याचे पाणीही कमी पडू लागले! अन्य उपाय न उरल्यामुळे आता ब्रिटीश अधिकाऱ्यांनी तहाचा मार्ग स्वीकारला आणि किल्ल्यावर पांढरा झेंडा फडकवला!

नानासाहेब पेशव्यांनी किल्ल्यातल्या लोकांना आत्मसमर्पण करायची आज्ञा दिली.



सर्व अधिकारी एकेक करून किल्ल्याबाहेर आले. बंडखोर त्यांना नानासाहेबांसमोर घेऊन गेले. ''तुमचं काम संपलंय. बोला आता आम्ही तुमचं काय करावं, तुमच्याशी कसा व्यवहार करावा?'' त्यांनी इंग्रजांना विचारले. एक अधिकारी नम्रपणे म्हणाला, ''आम्ही अलाहाबादला निघून जाऊन तेथे आमच्या देशवासीयांबरोबर रहायला लागू.''

दीर्घकाळ चर्चेनंतर बंडवाल्यांनी निर्णय घेतला की. ब्रिटीशांना नावांमधे बसवून अलाहाबादला पाठवून देण्यात यावे. त्यासाठी खूप वेगाने सोय करण्यात आली. काही फिरंग्यांनी तक्रार केली, की या नावा प्रवास करण्यालायक नाहीत. नानासाहेबांनी ताबडतोब आर्थिक व्यवस्था करून नावा दुरुस्त करवल्या.

एके दिवशी सूर्योदयाच्या वेळी जवळजवळ हजार इंग्रज नदीत सोडलेल्या नावांमधे पोचले. तात्या टोपेच्या आज्ञेने नावां अलाहाबादकडे रवाना झाल्या.

परंतु इतक्यात एक अप्रत्याशित घटना घडली. नावा निघत असताना त्या पहायला स्थानिक लोक हजारोंच्या संख्येने नदीकिनारी एकत्र आले. त्यांच्यात अनेकजण असे होते की, ज्यांचे बाप, काका, भाऊ किंवा कुटुंबाचा कोणी ना कोणी सदस्य ब्रिटीशांच्या अत्याचारांना बळी पडले होते. कानपुरमधील कंपनीच्या शासनाचा अन्त झाल्याची खबर आगीप्रमाणे सर्वत्र पसरताच आसपासच्या गावातले कित्येक सैनिक तेथे धावून आले. या सैनिकांनी अकस्मात बंदुका चालवून गोळीबार सुरू केला. त्यामुळे उत्साहित होऊन नदीकिनाऱ्यावर जमलेल्या कित्येक नागरीकांनी नदीत उड्या मारून नावांमधे बसलेल्या ब्रिटीश लोकांना पाण्यात खेचले. काही मिनिटातच या दृश्याने भयानक स्वरूप धारण केले. बंड करून उठलेले लोक पुनःपुन्हा असे म्हणत त्यांना मारत राहिले की, "हा जिवन्त राहिला, तर आम्हाला मारायला पुन्हा परत येईल." याबरोबरच त्यांच्यात सूडभावनाही प्रज्वलित होत होती.

नानासाहेब पेशव्यांना या अपघाताबद्दल कळता-कळता घडायचे ते घडून गेले होते. फक्त विद्रोही लोकांना पुनःपुन्हा ते इतकेच सांगू शकले की, 'स्त्रिया व मुलांना तरी मारू नका.' फलस्वरूप फक्त सव्वाशे नायकामुळेच काय ती वाचू शकली. नानासाहेब पेशवे त्या सर्वांना स्वतःच्या इमारतीत घेऊन गेले व त्यांनी काही आठवडेपर्यन्त त्यांच्या आवश्यक सोयींकडे लक्ष दिले.

तात्कालिक रूपात तर कंपनीचे शासन संपले. नानासाहेब पेशव्यांना त्या प्रान्ताचा 'राजा' जाहीर केले गेले. नगरभरात आनन्दोत्सव साजरा झाला. ब्रिटिशांच्या ताबडीतून आपण सुटलो, सैतानांच्या हातातून वाचलो असेच सर्वांना वाटत होते. जिवन्त असलेले ब्रिटीश आता आपल्या देशी परत जातील अशीच त्यांची कल्पना होती.

कानपुर शहर बंडखोरांचा विजयोत्सव साजरा करत असताना, तिकडे झाशी नगरही चुप बसले नव्हते.

क्रमशः





# अुपकार-प्रत्युपकार

सीतारामपुर गावात धनदास नावाचा एक धनवान माणूस रहात असे. तो मोठ्या वक्रबुद्धीचा होता. दररोज तो कोणाला ना कोणाला सतावून त्यातून आपली करमणूक करून घेई. त्यासाठी तो पैसेही खूप खर्च करी. यामुळेच रोज कोणी ना कोणी 'बळीचा बकरा' त्याला मिळतच असे.

धनदास दररोज आपल्या मित्रमंडळासह घराच्या ओट्यावर बसे. पैशांची गरज असणारे लोक त्याला तिथेच भेटायला जात. आणि तो देत असलेली शारीरिक व मानसिक वेदना सहन करून नंतर पैसे घेऊन निघून जात. पण त्यातून सुख-संतोष मात्र मिळत नसे. ते आपलं दुःख, क्रोध किंवा असंतुष्टता प्रकटही करत नसत. पण अशा प्रकारामुळे त्याच्या शत्रूंची संख्या मात्र वाढत राहिली.

त्या देशच्या राजाला वेष पालटून फिरायची सवय होती. एके दिवशी एका दरिद्री शेतकऱ्याच्या वेषात तो सीतारामपुरला आला. धनदासच्या बाबतीत बरीच माहिती मिळाल्यामुळे तो त्याच्याचकडे गेला.

धनदास नेहमीप्रमाणे त्यावेळी आपल्या घराच्या ओट्यावर बसलेला होता. वेषान्तरातल्या राजाला पाहून त्याला वाटले की, कोणी बिचारा गरीब शेतकरी आपल्याकडे धन मागायला आलाय. त्याने राजाला विचारले, "किती धन हवं तुला?"

राजा निस्संकोचपणे अुत्तरला, "शंभर अशर्फ्या."

"तर मग तुला आधी बैल बनावं लागेल. आपल्या डोक्यावर तुला शिंगं बांधावी लागतील. नंतर तुला नन्दीबैलाच्या वेषात सजावं लागेल. बरोबर ढोल आणि शहनाई घेऊन दहा घरांसमोर नाचून यावं लागेल."

हे ऐकताच राजाला क्रोध आला. आपल्या खऱ्या रुपात प्रकट होऊन तो म्हणाला,

गिरिजा जोशी



''दुष्टा, मी राजा आहे या देशाचा! तुझ्या खोड्यांबद्दल खूप ऐकलं होतं मी! आता तर प्रत्यक्षही पाहिलंय. तू माणूस नव्हेस, राक्षस आहेस राक्षस! तुला मी आजन्म कारावासाची शिक्षा देत आहे. भोग आता!''

धनदासचा चेहरा या अनपेक्षित घटनेने विवर्ण झाला! राजाच्या पायांवर लोटांगण घालून त्याने क्षमा मागितली. पण राजाचा राग शान्त होईना. त्याचा आवेग तसाच राहिला. ही बातमी कळून ग्रामाधिकारी धावत तेथे आला. अन् राजाला म्हणाला, ''महाराज, खूप पूर्वी धनदासच्या पित्यानं आपल्या पित्याला फार धोक्याच्या प्रसंगी मदत केली. त्यासाठी राजपरिवाराने धनदासच्या परिवाराच्या रक्षणासाठी विशेष व्यवस्था करून ठेवली आहे. मंत्र्याकडून त्यासंबंधीची कलमं आपण जाणून घेऊ शकाल. यासाठीच ग्रामाधिकारी असूनही मी धनदासच्या या खोड्यांबद्दल कसला आक्षेप घेऊ शकलो नाही; अकस्मात त्याला शिक्षा देणं उचित नाही होणार! आपली चूक सुधारायची संधी याला दिली जावी.''

आतापर्यन्त काहीशा शान्त झालेल्या राजाला ग्रामाधिकाऱ्याचे बोलणे न्यायसंगत वाटले. धनदासच्या परिवाराच्या रक्षणासाठी केलेल्या तरतुदीत नक्कीच काही चूक असावी असे त्याला वाटले. त्यामुळे धनदासला एक संधी द्यायचे त्याने ठरवले. तो धनदासला म्हणाला, ''दुष्ट माणसा, या गावात तुझा जो सर्वांत कट्टर शत्रु असेल, त्याची एक महिनाभर सेवा करत रहा. जमेल तितके उपकार कर त्याच्यावर. शत्रूवर उपकार करता करता तू त्याच्याही पुढे गेलास, तर मी तुला क्षमा करून सोडून देईन. नीट लक्षात ठेव, की भविष्यातली तुझी वागणूकच तुला वाचवू शकेल.''

पाहायला गेलं, तर सारा गावच धनदासचा शत्रु होता. त्यातनं कोणाला निवडावं, यासाठी त्याला फारसं डोकं खाजवावं लागलं नाही. त्याला ताबडतोब प्रमोदची आठवण आली.

एकदा प्रमोदच्या पायाला जखम झाली. बरोबर इलाज न केल्यामुळे त्या जागी नंतर गळू झालं. कामाला जाता न आल्यानं रोज मेहनत करून खाणाऱ्या त्याचं पोट भरेनासं झालं. बिचारा पैसे कुठून आणणार? तरीही तो वैद्याकडे गेला. अन् त्याने आपलं दुःख सांगितलं. वैद्य म्हणाला, ''तुझं गळू पिकायला लागलंय. स्वर्णभस्मावाचून दुसरं औषध आता काम करू शकणार नाही. वीस अशर्फ्या दिल्यास, तर औषध तयार करीन.''

मेहनतीच्या भरंशावर जगणाऱ्या प्रमोदला वीस अशर्फ्या कोण देणार? कोणी दिल्या, तरी ते कर्ज चुकवायचं कसं? त्यानं विचार केला की, धनदासनं आपल्याला सतावलं तरी निदान धन तर मिळेल?

धनदास त्याला म्हणाला, ''वीस अशर्फ्या देईन मी तुला. पण प्रथम तुझ्या गळवावर उपचार मी करणार.''

प्रमोदने कबुली दिली. धनदासने ताबडतोब त्याला एका खांबाला बांधले. त्याचे हातपायही बांधले आणि त्याला उभे करून त्याने प्रमोदच्या गळवावर मीठमिरचीचा ठेचा थापला आणि वरून लिंबू पिळले.

बिचारा प्रमोद त्या वेदना सहन करू शकेना. तो कळवळून ओरडू लागला. त्याच्या ओरडण्यामुळे धनदासला खूप मौज वाटली. जेंव्हा ही करमणूक पुरेशी वाटली, तेंव्हा प्रमोदला बंधन-मुक्त करून त्याने हातावर वीस अशर्फ्या ठेवल्या.

अशर्फ्या हाती घेतल्याबरोबर प्रमोदने धनदासच्या थोबाडीत मारली अन् म्हटले, ''दुसरा काही उपाय नसल्यामुळेच तुझे हे पैसे घेतो आहे मी. तरीसुद्धा कोणत्याही परिस्थितीत मी तुझा हा उपकार स्मरणार नाही. आजपासून तुझा सूड घेण्यासाठीच जगेन मी! तू माझा कट्टर शत्रू आहेस.''

धनदासने प्रमोदचीच निवड केली, त्याचं धनदासशी इतकं शत्रुत्व होतं की त्याच्यावर



कितीही उपकार केले तरी तो धनदासवर प्रत्युपकार करणार नाही, प्रत्युपकार करायचा म्हटलं तरी तो या चढाओढीत जिंकू शकणार नाही. कारण तो तर दरिद्री होता याशिवाय गावभरच्या लोकांनी त्याला फक्त शिव्याच दिल्या, प्रमोद एकटाच त्याच्या थोबाडीत मारणारा निघाला.

हा सारा विचार करूनच धनदासने प्रमोदचे नाव सांगितले. ग्रामाधिकाऱ्याने ताबडतोब प्रमोदला बोलावून घेतले. धनदासने राजाला पूर्वीची सारी हकिकत सांगितली आणि म्हटले, ''महाराज, या कट्टर शत्रु असणाऱ्या प्रमोदला मी भरपूर मदत करीन, त्याच्याबर उपकार करीन. पण त्याला स्वच्छ सांगा की, त्याला मी देईन त्यातलं काहीच मला परत देऊ नये.''



राजा, ग्रामाधिकारी व गावच्या काही प्रमुख व्यक्तींच्या अुपस्थितीत हा ठराव पास झाला. ठरावानुसार एकमेकांनी एकमेकांना मदत करायची होती. राजाने पुढची जबाबदारी ग्रामाधिकाऱ्यावर सोपवून म्हटले की, ''एक महिन्याने मी परत येअून काय, कसं घडतंय याचे परीक्षण करीन. अन् नंतर आपला निर्णय देईन.'' राजा यानन्तर राजधानीला गेला.

त्या दिवसापासून धनदासची वागणूक खूपच बदलली. प्रथम त्याने केलेल्या अपराधांबद्दल प्रमोदची क्षमा मागितली आणि वचन दिले की, यापुढे आपण कधीही त्याच्याशी अन्यायपूर्ण वागणुक करणार नाही. नंतर त्याने प्रमोदला आपलं एक सुन्दर घर कायमचे रहायला दिले. तेंव्हापासून प्रमोदच्या मनोरंजनासाठी धनदास रोज निरनिराळे कार्यक्रम घडवू लागला. त्याला त्याने मेजवानी दिली. त्याच्या नावे तो मंदिरात रोज पूजा अर्चा करवू लागला. महिना पुरा होत आल्यावर त्याने प्रमोदला आपली दोन एकर सुपीक जमीन बक्षिस दिली. आणि म्हटले की, 'मी दिलेल्या घरात तू आरामात रहा अन् शेती करून सुखानं आपलं आयुष्य घालव.''

या एक महिन्यात प्रमोदने धनदासवर प्रत्युपकार करायचा मुळीच प्रयत्न केला नाही. साऱ्या गावानं याबद्दल त्याच्यावर टीका केली की, ''कसा स्वार्थी आहे पहा! मान द्यायलाही जमत नाही याला!''

मुदत पुरी झाल्यावर राजा सीतारामपुरला आला. ग्रामाधिकाऱ्याने साऱ्या गावकऱ्यांना गोळा केले. सर्वांसमक्ष राजाने धनदासच्या चांगल्या कामांबद्दल त्याची प्रशंसा केली, आणि प्रमोदला म्हटले ''तू धनदासवर कसलाच अुपकार केल्याचं दिसत नाहीय?''

हसून प्रमोद म्हणाला, ''ठरावाप्रमाणे शत्रूला मदत करायला हवी. पण पहिल्याच दिवशी धनदासनं जेंव्हा माझी क्षमा मागितली, तेंव्हापासून मी त्याच्याशी शत्रुत्वही विसरून गेलो. ठरावाप्रमाणे मदत शत्रूला करायची होती ना?''

त्याचे हे अुत्तर ऐकून सर्वजण आश्चर्य चकीत झाले. धनदासने शेवटपर्यन्त प्रमोद शत्रू असल्याचं लक्षात ठेवल्यामुळेच तो प्रमोदला मदत करत राहिला. पण प्रमोद पहिल्याच दिवशी शत्रुत्व विसरून गेला. अशा स्थितीत आता धनदासला 'मोठा माणूस' कसं म्हणावं? शत्रुत्वाची भावना विसरून जाण्यापेक्षा मोठा अुपकार तो काय असणार?

सर्वजण असा विचार करत असताना धनदास अुठून म्हणाला ''मी कबूल करतो की गालावर थप्पड खाण्यापूर्वी मी प्रमोदच्या जिवाशी खेळलो होतो, पण अशी प्रबल शत्रुत्वाची भावना, केवळ 'मला क्षमा कर' म्हणण्यानं नाहीशी झाली! अशा चांगल्या शब्दांना इतकं अधिक मूल्य असू शकतं हे मला कधी कळलंच नाही. अन् त्यामुळेच मी अन्याय आणि अत्याचारपूर्ण कामं करत राहिलो. आपल्या त्या वागण्याची आता मला फार लाज वाटत आहे.''

राजाने धनदासला बसायला सांगितले आणि प्रमोदला विचारले, ''धनदासशी असलेली आपली शत्रुत्वभावना तू विसरलास ही मोठीच मुद्याची - महत्वाची गोष्ट! त्यामुळे मागच्या एका महिन्यापासून तो तुझा मित्रच आहे. पण बिना संकोच तुझा मित्र तुझ्यावर अुपकार करत असताना तुझ्यात प्रत्युपकाराची भावना का अुत्पन्न झाली नाही?''

प्रमोद अुत्तरला, ''महाराज, मी जखमेनं त्रासलो असताना रागाने याला खूप शिव्या दिल्या, थोबाडीत मारली, पण नंतर तो राग अुरला नव्हता. त्यानं दिलेल्या पैशांमुळेच जखम बरी झाली. त्यामुळे याच्याबद्दल माझ्या मनात कृतज्ञताच आहे. माझ्यासारख्या गरीबाची अडचण कायमची दूर झाली, तर तात्कालिक स्वरूपाची वेदना विसरायची शक्ती आमच्यात असते. आमची दु:खं जाणण्यासाठी क्वचित येणाऱ्या महाराजांना माझं बोलणं विचित्र वाटेल. मी काही प्रत्युपकार केला असता अन् त्याचं मूल्य मोजलं गेलं असतं, तरं धनदासला अुमरकैदेची शिक्षा मिळाली असती. त्यामुळेच कुठल्याही प्रकारच्या प्रत्युपकारापासून मी दूर राहिलो. हाच माझा प्रत्युपकार मानतो मी!''

प्रमोदच्या औदार्याची राजाने तारीफ केली आणि म्हटले, ''खरं तर प्रमोदच अुपकारांच्या या स्पर्धेत जिंकला आहे. मी धनदासला मनापासून क्षमा करतो आहे. यानंतर मी या देशातल्या दीन-दरिद्री लोकांसाठी सर्व सुखांची व्यवस्था करतो. त्यामुळे धनदाससारख्या स्वार्थी, विचित्र स्वभावाच्या व्यक्तींशी कुणाचा संबंधच येणार नाही.''



# पहिली भारतीय महिला अंतरिक्ष-यात्री

कल्पना चावला कर्नाळच्या टागोर बालनिकेतनमधे शिकत असताना आपल्या वह्या विमानांची चित्रे काढून भरून ठेवी. हायस्कूल शिक्षण संपल्यावर तिने डॉक्टर बनावे अशी तिच्या आई-बापांची इच्छा होती. परंतु इंजिनियरिंग शिकायची तिची स्वतःची इच्छा होती. हट्ट करून तिने अंतरिक्ष-शास्त्र (एरोनॉटिक्स) हा आपला मुख्य अभ्यासविषय निवडला. अठरा वर्षांच्या अथक परिश्रम व अध्ययननानंतर नोव्हेंबर १५ ला ती सहा अंतरिक्ष-यात्रींबरोबर कोलंबियाच्या अंतरिक्षयानातून अंतरिक्षात भुतरण्यासाठी निघाली. अंतरिक्षयात्रा करणारी ती पहिली भारतीय स्त्री होय. यांबरोबर आशिया देशांतूनही अंतरिक्षात जाणारी तीच पहिली स्त्री होय. आपल्या या साहसपूर्ण प्रवासाने तिने सर्वांचे लक्ष आकर्षून घेतले.



कर्नाळ हे हरियाना राज्यातले एक छोटेसे शहर असून ते दिल्लीच्या सरहद्दीवर वसलेले आहे. कल्पना चावलाचा जन्म इथेच झाला. अंतरिक्षशास्त्र हा आपला मुख्य अभ्यास विषय निवडणारी ती केवळ पहिली स्त्रीच नव्हे, तर त्या विभागात पहिली आलेली स्त्रीही आहे. अध्यापकांनी तिची खूप प्रशंसा केली. पदवी मिळाल्यानंतर आणखी उच्च शिक्षणासाठी अमेरिकेत जाऊन तिने संशोधन केले डॉक्टरेट मिळवली. तिचा परिचय व्यापारी विमानचालक जीन हॅरिसनशी झाला. नंतर तिचा विवाह झाला. पतीच्या परवानगीने तिनेही व्यापारी विमान चालिकेचा परवाना मिळवला. १९७९ मधे तिने एकटीनेच विमान चालवले.

यानन्तर तिचे लक्ष अंतरिक्षबद्दलच्या संशोधनावर केन्द्रित झाले. 'नॅशनल एरोनॉटिक्स अॅण्ड स्पेस अॅडमिनिस्ट्रेशन' (नासा) मधे दाखल झाली व नंतर एका विभागाची भुपाध्यक्षा बनली. अंतरिक्षात जाणारांसाठी ज्या ज्या जाहिराती प्रसिद्ध झाल्या, त्या तिने पाहिल्या. १९९२ मधे तिने आवेदनपत्र भरले पण १९९२ मधे तिची निवड झाली नाही. १९९४ मधे तिने पुन्हा अर्ज भरला. ३००० भुमेदवारांनी अर्ज भरले होते. त्यातून शारीरिक व मानसिक चिकित्सेसाठी डॉक्टरी परीक्षेनंतर भेकोणीस भुमेदवार निवडले गेले. यात एक कल्पना चावलाही होती. १९९६ मधे निवड होऊन शेवटी तिला सोळा महिने प्रशिक्षणासाठी हाअुस्टनच्या केन्द्रात पाठवले गेले. नासाने ८८ वे अन्तरिक्षयान पाठवण्याची व्यवस्था केली. यात तीन अमेरिकेन अंतरिक्षयात्री होते. जपानमधली पहिली अन्तरिक्षयात्री महिला टका डोलही एक सदस्या होती. युक्रेनियन देशातला एक अंतरिक्षयात्री यात होता, अन् या सर्वांबरोबर नोव्हेंबर १९ रोजी कोलंबियाच्या ८८ व्या अंतराळयानातून कल्पना चावलाही अंतराळयात्रेसाठी निघाली.

अंतराळात व्यतीत करायच्या पंधरा दिवसात त्यांना द्रव आहारच घ्यावा लागणार आहे. दररोज सोळा तास त्यांना या अनुसंधानाबद्दलचे काम करत रहावे लागेल. अुरलेले आठ तास ते क्रमाक्रमाने झोपू शकतील.

अंतरिक्षयानात जे संशोधन केले जाणार आहे ते कल्पना चावलावर सोपवलेले आहे. स्वतंत्र अुड्डाण सॅटलाईटही तीच देते. त्याद्वारे सूर्याचे अध्ययन केले जाते. टका डोलही अंतरिक्षात जाणार आहे.

कल्पना चावलाची ही अंतराळयात्रा आपल्या देशातले लोक मोठ्या आवडीने पहात असतात. या यात्रेला निघण्यापूर्वी भारतीय प्रतिनिधींना ती म्हणाली, ''भारतासाठी ही मोठ्या अभिमानाची वेळ आहे.''



# भेदवती

रामदास व लक्ष्मी हे मोठे पुण्यवान जोडपे होते. ते चन्दनपुरला रहात असत. बऱ्याच काळानन्तर त्यांनी एका कन्यारत्नाला जन्म दिला. हसऱ्या चेहऱ्याची ही मुलगी फारच सुन्दर दिसे, तिने कसलाही आवाज केला की वेदपठन चालू असल्यासारखे वाटे, म्हणून तिचे नाव ठेवले वेदवती.

एके दिवशी आईचे दूध पीत असताना तिने तिच्या साडीचा काही भाग मुठीत घट्ट पकडला. तो सोडवायचा आईने खूप प्रयत्न केला. पण मूठ तिला सोडवता येईना. रामदासनेही खूप प्रयत्न केला. शेवटी मुलीने पकडलेला साडीचा भाग फाटून तिच्या हातात राहिला अन् साडी मोकळी झाली. इतकी किंमती साडी फाटल्याबद्दल लक्ष्मीला वाईट वाटलेच, पण अवध्या तीन महीन्याच्या मुलीला कोण काय म्हणणार ! पण ज्यांना ज्यांना ही गोष्ट समजली, ते म्हणत राहिले की, 'इतक्या लहान बाळाची ही ताकद अजबच म्हणायला हवी'.

आणखी तीन महिन्यांनंतर अशीच रांगत येऊन वेदवतीने एक स्टूल इतक्या जोराने खेचले की त्यावरची एक बरीच जुनी अशी काचेची सुरई खाली पडून फुटली. सुरई वरची नक्षी मोठी सुन्दर असल्याने ती फुटल्याचे रामदासला फार वाईट वाटले. पण बाळाला कसली जखम न झाल्याचेच लक्ष्मीला समाधान होते !

वर्षाची होता-होता वेदवतीने घरातल्या बऱ्याच वस्तूंची तोडफोड केली. काही लोकांना वाटे की, 'घरात लहान मूल असले की अशी तोडफोड चालायचीच !' पण काही जणांना वाटे की 'मुलीवर नक्कीच कसल्यातरी दुष्ट शक्तीचा पगडा बसलेला आहे !' रामदासलाही वाटले की, हा काही निराळाच प्रकार असावा !

आनन्द चौधरी

इतक्याशा लहान मुलीची शक्ती पाहून रामदासला लोकांचे म्हणणे खरेच वाटून तो एका हठयोग्याला भेटायला गेला.

चन्दनपूरपासून काही कोसांच्या अंतरावर हा हठयोगी रहात असे. त्याला 'अष्टसिद्धी साध्य असल्याचे' मानले जाई. 'त्याला माहीत नाही, असा मंत्र नाहीच' असे लोक म्हणत. रामदासने त्याला जेंव्हा आपली अडचण सांगितली, तेंव्हा हठयोगी फारच आनन्दला. आपले सामर्थ्य दाखवून देण्याची आणखी एक संधी चालून आल्यासारखे त्याला वाटले. तो रामदाससह चन्दनपुरला आला. बरोबर त्याने आपली मंत्राची काठी 'मंत्रदंड'ही घेतला होता.

वेदवती लटपटत चालत टेबलाजवळ आली त्यावरच मन्त्रदण्ड ठेवलेला होता. वेदवती मंत्रदण्ड अुचलायचा प्रयत्न करू लागली. तो हाती घेताच तिच्या हातून खाली पडून तो तुटून गेला ! ते पहाताच हठयोगी छाती पिटत म्हणाला, "माझ्या मंत्रदंडाचेही तुकडे तुकडे तू ज्याअर्थी केलेस, त्याअर्थी हे स्पष्टच दिसतंय की तू कोणी सामान्य मुलगी नाहीस. तुला 'वेदवती' नव्हे तर सगळ्याचा भेद करणारी सगळं मोडणारी, 'भेदवती' म्हणायला हवं. मी आता क्षणभरही इथे थांबणार नाही. तुझ्यावर अुपाय करणं मला अशक्य आहे." अन् ते तुकडे घेअून तो निघून गेला.

तेंव्हापासून वेदवतीला सर्वजण 'भेदवती'च म्हणू लागले. आपल्या नव्या नावाप्रमाणेच प्रताप करत ती किशोर वयात पोचली. तिच्या वागणुकीमुळे आईवडील नेहमीच चिन्तेत असत. ती झाडाचे फळ तोडू पाही, तर फान्दीच मोडून पडे ! एकादी कळी काढू पाही, तर मुळासकट रोपच अुपटले जाई ! विहिरीतून पाणी





काढू पाही, तर बादलीच पाण्यात राहून जाई ! घरात केर काढू पाही, तर जमिनीत खड्डे पडत ! भांडी घासू पाही, तर ती वाकडी तिकडी होत ! कपडे धुवायला लागली, की ते फाटून जात ! तिच्या हातून नेहमीच कोणत्या ना कोणत्या वस्तूचा नाश होई, त्यामुळे तिला कोणी कसलं काम सांगू धजत नसे.

भेदवती कधी कोणाच्या घरी गेली तर घरचे लोक तिला पाहूनच भिऊन जात. त्यामुळे मैत्रिणींशी खेळायला ती गावा-बाहेर जाई. आपल्या मुलीच्या भविष्याबद्दल आईवडील काळजीतच असत. तिच्या बाबतीत विचार करायलाही त्यांना भीती वाटू लागली.

इकडे चन्दनपुर पासून कोसभर अंतरावर असलेल्या मृत्तिकापुरात नंदन नावाचा एक तरुण आपल्या चित्रविचित्र चमत्कारांबद्दल प्रसिद्ध झाला होता. त्या बळावरच तो रत्नांची चोरी करत असे. त्याच्या चोरीची पद्धत अशी होती. - एक विशिष्ट प्रकारच्या मातीची तळहाताच्याही अर्ध्या आकाराची मानवी मूर्ती तो बनवत असे. रत्नांच्या दुकानात चोरी करताना तो चलाखीने रत्न अशा ओल्या मूर्तीत दडवी. त्याबरोबर ती मूर्तीही वज्रासारखीच कठीण बने. नंतर घरी गेल्यावर मूर्ती तोडून तो हिरा काढून घेई. ही विद्या फक्त नन्दनलाच माहीत होती. त्यामुळे कोणाला त्याचा कधी संशयही येत नसे. तो रत्नचोर असल्याचे कोणालाही ठाऊक नव्हते.

नन्दन एके दिवशी वज्रपुरीला गेला. तेथे तो हिरालाल नावाच्या एका तरुणाच्या दुकानात जाऊन जणू आपण रत्न खरीदणारे गिऱ्हाईक आहोत असे भासवून रत्ने पाहू लागला. तसे करता करताच त्याने एक रत्न मोठ्या चलाखीने हातातल्या मूर्तीत घुसवले. तेथे काम करणाऱ्या एका नोकराने त्याची हालचाल हेरली अन् मालकाला चोरीची वार्ता सांगितली. येऊन पाहिले तो खरोखरच एक रत्न नाहीसे झाल्याचे हिरालालच्या लक्षात आले.

नन्दनच्या मूर्तीवर रत्न आत कोंबल्याची काही खूणही दिसत नव्हती अन् मूर्तीही चांगली कडक होती ! तरीही नोकर वारंवार आपण 'चोरी पाहिल्याचे' सांगत होता.

''हे पहा मालक, ही मूर्ती तर एका अभेद्य पदार्थाची बनलेली आहे 'मी हिच्या आत कुठे रत्न दडवलंय' असं म्हणणंही हास्यास्पद आहे.'' नन्दन आपली खोटी नाराजी प्रकट करत बोलला.

तरीही आपली शंका न सोडता हिरालाल म्हणाला, ''माझा नोकर कधीच खोटं बोलत नाही. अन् याशिवाय दुकानातला एक हिरा कमीही झालाय. ही मूर्ती आम्ही मोडून पाहिली तर तुमची काही हरकत आहे का ?''

नन्दनने परवानगी देताच मूर्ती फोडायचे बरेच प्रयत्न त्या दुकानात केले गेले. प्रथम हाताने फोडायचे प्रयत्न फसल्यावर ती हातोडीने फोडायचे प्रयत्न झाले. नंतर हिरे कापायच्या यन्त्राचाही प्रयोग करून झाला.

मूर्तीत काहीही फरक न पडता ती जशीच्या तशीच राहिली. काहीजण म्हणू लागले की ''इतक्या कडक मूर्तीत हिरा दडवताच येणार नाही, अशक्य आहे ते.''

पण फक्त हिरालालच म्हणत राहिला की, ''माझ्या हरवलेल्या हिऱ्याची किंमत पाच लाख अशर्फ्या आहे. मूर्ती जोवर फोडली जात नाही, तोवर मी त्यात हिरा नसल्याबद्दल विश्वास ठेवणार नाही ! मूर्ती फोडायचा दुसरा काही उपायच नाहीय का?'' तो बिचारा फारच काळजीत होता.

इतक्यात चन्दनपुरच्या एका नागरीकाने दुकानात प्रवेश केला. हा विषय समजल्यावर तो म्हणाला, ''आमची भेदवती हे काम नक्कीच करून दाखवील.'' त्याने सर्व उपस्थितांना भेदवतीची हकिकत सांगितली.

ती ऐकल्यावर दुकानातले सर्व लोक म्हणाले, ''ही तर एक कपोलकल्पित गोष्ट वाटतेय. ऐकायला बरं वाटतंय पण यात वास्तविकता वाटत नाहीय. हे तर असाध्य





काम आहे.'' पण हिरालाल म्हणाला, ''गोष्ट नुसती हवेत सोडू नका. कोणत्या बिळात कोणता साप असेल कोणी सांगू शकेल का ? मला वाटतंय की, नन्दनही काही चमत्कार जाणत असावा. या मूर्तीत हिरा दडवला असल्याचं मी सिद्ध करू शकलो, तर एका हिरेचोराला पकडून देण्याचं श्रेय मिळेल मला. सरकारही खूश होईल माझ्यावर ! भेदवती ही मूर्ती भेदू शकली, तर मी तिला एक लाख अशर्फ्या बक्षिस देईन !''

नंदननेही आव्हान स्वीकारात म्हटले, ''भेदवती ही मूर्ती तोडू शकली नाही, तर माझ्या वाडवडलांपासूनचे माझ्याजवळचे सर्व हिरे या हिरालालने बरोबर रकम देऊन खरीदायला हवेत.''

''अन् मूर्तीतून हिरा निघाला, तर तुझ्याकडचे सगळे हिरे मी फुकट घेणार अन् ते सर्व सरकारच्या हाती देणार ! अट कबूल ?'' हिरालालने विचारले.

शेवटी या अटी ठरून दोघेही मूर्तीसह चन्दनपुरला पोचले. रामदासकडे जाऊन हकिकत सांगण्यापूर्वी गावाबाहेरच काही मुलं खेळत असलेली त्यांना दिसली. त्यांच्यात नक्षत्रांमधे 'चान्दोबा' सारखी चमकणारी भेदवतीही त्यांना दिसली. तिच्या सौन्दर्याने ते अवाकच झाले ! नंतर तीच भेदवती असल्याचे त्यांना कळले. इतक्यात काही गावकरीही त्यांच्याभोवती जमले.

मूर्ती भेदवतीला दाखवत हिरालाल तिला म्हणाला, ''माझं नाव आहे हिरालाल. हिऱ्यांच्या व्यापार करतो मी. या मूर्तीत पाच लाख अशर्फ्या मोलाचा एक हिरा दडला आहे. मूर्ती फोडायचे आम्ही खूप प्रयत्न केले, पण ते असफल झाले. तू मूर्ती फोडण्यात सफल झालीस, तर मी तुला एक लाख अशर्फ्या बक्षिस देईन.''

नन्दनही चटकन तिच्याजवळ जात म्हणाला, ''जर यात हिरा नसल्याचं शाबित झालं, तर मी तुझ्याशी लग्न करीन.'' त्याने स्वतःची ओळखही दिली.

यावर नाराज होत भेदवती म्हणाली, ''लग्नाची गोष्ट माझ्या आईवडलांशी बोला. द्या ती मूर्ती इकडे, हातोड्याने फोडली न जाणारी, अन् यन्त्रानं कापली न जाणारी मूर्ती रिकाम्या हातानं फोडता येते का , हे पहाते मी.''

हिरालालच्या हातून मूर्ती घेतानाच तिच्या हातून ती सुटून खाली पडली अन् एका मोठ्याशा दगडावर आपटून तिचे तुकडे-तुकडे झाले. त्यातून हिराही बाहेर आला !

''पहा माझा हिरा !'' म्हणत हिरालालने झडप घालून तो उचलला. नंतर उच्चस्वरात ओरडून म्हणाला, ''यात नक्कीच काही फसवणूक आहे. असला धोकेबाज धनासाठी खून करायलाही कचरणार नाही.'' अन् तो तेथून पळून जाऊ लागला.

गर्दीतल्या काहीजणांनी पाठलाग करून त्याला पकडले.

हिरालाल त्यांना म्हणाला, ''याला शहरात नेऊन कोतवालाच्या हवाली करा. याच्या घरी चोरीचे खूपसे हिर आहेत, ही बातमीही द्या त्यांना.''

रामदास अन् लक्ष्मीला जेंव्हा समजले की, आपल्या मुलीभोवती खूपशी माणसे जमली आहेत, तेंव्हा तेही धावत-पळत तेथे आले. भेदवतीने सारी घटना स्पष्ट करून हिरालालकडे बोट दाखवत म्हटले की, ''मूर्ती फोडली. तर मला एक लाख अशर्फ्या हे बक्षीस देणार असं म्हणाले.''

रामदास व लक्ष्मीचा यावर विश्वास बसेना त्यामुळे ते हिरालालकडे निरखून पाहू लागले. तेंव्हा त्यांना नम्रतेने नमस्कार करून हिरालाल म्हणाला, ''लाख अशर्फ्यांच काय, पण तुमची परवानगी असेल, अन् भेदवती तयार असेल, तर मी हिच्याशी लग्न करायलाही तयार आहे.'

भेदवती पटकन लाजून आईच्या मागे दडली. रामदास अन् लक्ष्मी खूश होत म्हणाले, ''आम्हाला तरी याहून अधिक काय हवं बेटा ! या भेदवतीच्या हातून मन्त्रदंडाचेही पार तुकडे तुकडे झाले. असल्या मुलीशी लग्न कोण करणार, याची काळजी पडली होती आम्हाला !''

काही दिवसांनंतर हिरालाल वेदवती यांचा विवाह थाटामाटाने साजरा झाला. यानन्तरही तिच्या हातून अनेक वस्तु मोडत राहिल्या. पण नंतरही कोणी तिला 'भेदवती' म्हणत असत. याचं पहिलं कारण म्हणजे ती आता धनवान होती अन् दुसरं म्हणजे ते नाव तिची पदवी मानली जाऊ लागली. यामुळे नंतर सर्व जण तिला 'वेदवती'च म्हणू लागले.



# बाप तसा बेटा

**मा**धवला भेटायला मंगल त्याच्या गावी आला. दोघांना भेटून मधे बराच काळ लोटला होता. माधव एक संपन्न शेतकरी होता. त्याच्या पित्याने शेतीबरोबर तांदूळ व गव्हाचा व्यापार करून बऱ्यापैकी संपत्ती मुलासाठी मागे ठेवली होती.

माधवला एकच मुलगा होता. अभ्यासाची त्याला जराही आवड नव्हती. लहान-लहान कामेही तो नीट करू शकत नसे. मंगलला वाटत होते की, हा मुलगा काहीसा मतिमन्दही आहे.

बोलता-बोलता एकदा मंगल माधवला म्हणाला, ''तुझा मुलगा बराच मन्द वाटतोय. त्याला एखाद्या चांगल्या शिक्षकाची शिकवणी का नाही ठेवत ? लिहायवाचायला शिकेल, तर शहाणा होईल ! शेवटी तुझी इस्टेट तर त्यालाच संभाळायची आहे ना ? तू त्याच्याकडे नीट लक्ष न दिलंस, तर हे काम करायला लायक बनायचा नाही, माझं ऐक, त्याच्या शिक्षणाची चांगली व्यवस्था कर !''

माधव यावर काहीसा नाराज होऊन म्हणाला, ''मंगल, असं माझ्या बाबांनी काय मला जास्त शिकवलं ? शिकलो तरी काय मी असा ? माझा मुलगा दिसायला वेडपट वाटतोय, पण तो चांगला बुद्धिमान आहे ! तूच आजमावून पहा वाटलं तर !''

मंगलनं मुलाला जवळ बोलावून विचारले, ''सध्या कोणता ऋतु चालू आहे, सांग बरं बेटा ! उन्हाळा, पावसाळा, की हिवाळा चालू आहे ?''

''मला नाही ठाऊक कोणता ऋतु चालू आहे तो ! दुकानात तर पाहू तिथे आंबेच आंबे दिसत असतात !''

त्याच्या उत्तरावर हसून मंगलने विचारले, ''बरं, मग सांग पाहू आंबे कुठून येतात ?''

तो ताबडतोब उत्तरला, ''टोपल्यांतून !''

दुसऱ्याच क्षणी मुलाकडे रागावून पाहून तो मंगलला म्हणाला, ''तू तर बरोबरच बोललास हं ! माझा मुलगा बुद्धीनं मंदच आहे. 'आंबे बाजारातून येतात' इतकंही माहीत नाही बिचाऱ्याला !''

''हं ! बाप तसा बेटा !'' असे स्वतःशी म्हणत मंगल हसला.

कमल वापट







# सम्राट अशोक

## १२

(आपणामागून सिंहासनाचा वारस कोण असावा हे जाहीर न करताच राजा बिन्दुसार मृत्यु पावला. सुशेमला या मृत्युची बातमी मिळूनही तो तक्षशिलाहून निघाला नाही. अशोक उज्जयिनीहून थोडी सेना घेऊन पाटलीपुत्रला पोचला. त्याला ठार करण्यासाठी झालेले कारस्थान असफल झाले. त्या युद्धात चार राजकुमार ठार झाले. वडील धाऱ्यांचा निर्णय व आज्ञेनुसार अशोकने पित्याचा अग्निसंस्कार केला. सेनापती, प्रधानमंत्री व राजपुरोहित यांनी एकमताने ठरवले की राजसिंहासनावर बसायला केवळ अशोकच सर्व प्रकारे लायक असल्याने त्यालाच राज्याभिषेक केला जावा.) -नंतर ...

**म**गधच्या प्रजेला राजा बिन्दुसारच्या मृत्युमुळे दुःख झाले. त्याबरोबरच चार राजकुमार मारले गेल्याचेही फार दुःख झाले. पण स्वतःच्या मृत्यूला ते स्वतःच कारण असल्याचे आणि त्यांचा लोभ व दुष्टपणा या गुणांनीच त्यांना मृत्यूच्या खाईत लोटल्याचे कळल्यावर प्रजा काहीशी शान्त झाली.

मध्यरात्रीच्या वेळी प्रधानमन्त्र्याने राज्याधिकार अशोकच्या हाती सोपवला. अशोक सिंहासनावर बसला, पण त्याने राज-मुकुट मात्र धारण केला नाही. तो म्हणाला, ''या विषादपूर्ण अवस्थेत राज्याभिषेक करून घ्यायला मला प्रशस्त वाटत नाहीय. मी इतक्यातच मुकुट धारण करणार नाही.''

मन्त्रीगण व सेनाध्यक्ष आदि लोकांनी अशोकच्या या निर्णयाचे स्वागत केले व त्याचे अभिनन्दन केले. परन्तु त्यांच्यांपैकी



कोणीही शान्त राहू शकेना. बिन्दुसारचा ज्येष्ठपुत्र तक्षशिलाहून केंव्हा येऊन धडकेल व कशा प्रकारचे अत्याचार करू पाहील, या बद्दल ते चिन्तेत होते.

इकडे तक्षशिलामधे सुशेमने प्रथम नर्तकींच्या बोलण्यावर विश्वास ठेऊन स्वतःची अशी समजूत करून घेतली की अशोक हालचाल करण्याच्या परिस्थितीत नसून त्याला पक्षाघात झालेला आहे. यामुळे निश्चिन्त होऊन तो आपला वेळ घालवत होता. त्याच्या आईने त्याला रहस्यपूर्वक आणखी एक पत्र पाठवून कळवले की, ''तुझे पिता मृत्यु पावले आहेत. पण सध्या तू पाटलीपुत्रला येऊच नकोस.'' पत्र वाचून सुशेम क्षणभर स्तंभित झाला अन् पत्र घेऊन येणाऱ्या दूताकडे रागावून पाहू लागला.

महाराजांचा मृत्यू, त्यांच्या दहनसंस्कारापूर्वी झालेल्या लढाईत बाकी चार राजकुमारांचा वध व नंतर अशोकचे सिंहासनारूढ होणे इ. सर्व त्या दूताने सुशेमला सांगितले.

''बापरे ! काय भयंकर दुर्घटना ही ! त्या दासीपुत्राला जगू देणार नाही मी ! याच क्षणी त्याचे तुकडे तुकडे करून टाकतो पहा ! मला तावडतोब पाटलीपुत्रला जायला हवे ! दलनायकांना बोलवा !...'' असे सुशेम ओरडत राहिला.

''पण महाराणींनी आपणाला पाटलीपुत्रला न येण्याबद्दलचा सावधगिरीचा इशारा दिला आहे !'' दूताने हात जोडून नम्रपणे सुचवले.

''गप बस !'' दूताला खाली ढकलत सुशेम ओरडला. ''माझं बोलणं मुकाट्यानं ऐक ! माझ्या विरुद्ध कोणी काहीही बोलायचं नाही ! मी भावी महाराज असल्याचं माझ्या वडिलांनीच ठरवलं होतं. अग्निसंस्काराच्या वेळी मी हजर नव्हतो, याचा अर्थ असा नव्हे, की त्या सर्वांनी महाराजांचा निर्णय मोडावा ! असं मन मानेल तसं करणारे ते कोण ? अधिकार काय त्यांचा ? हे सगळं तो कोल्हा भल्लाटकच करत असणार !'' असे बोलत शेपटीवर पाय पडलेल्या सापासारखा सुशेम फुस्कारत राहिला.



प्रधानमन्त्री, सेनाध्यक्ष यांना सुशेम मोठ्या सैन्यासह पाटलीपुत्रकडे यायला निघाल्याचे समजले, तेंव्हा ते फार घाबरून गेले. त्यांच्या मनावर मोठाच आघात झाला.



आता काय करावे, याबद्दल चर्चा करण्यासाठी अशोकने त्या सर्वांना बोलावून घेतले. सर्वजण गुप्त-मसलतीच्या दालनात जमले. अशोक त्यांना म्हणाला, ''सुशेम ससैन्य इकडे येत असल्याचे तुम्हाला कळलंच आहे. याबद्दल आता आपला काय सल्ला आहे ?''

कोणीच तोंड उघडेना ! सर्वच गप्प राहिले. पसरलेली शांतता मोडत अशोक पुन्हा म्हणाला, ''मित्रांनो, गप्प रहाण्याची ही वेळ नव्हे. आपण सर्वजण मगधचे हितैषी आहात. मला आपला सल्ला हवाय !''

''प्रभु आपणच मुकुटाभिषेक आत्ताच नको, असं म्हणालात. तरीही आम्ही आपणालाच महाराज मानतो. शत्रू जेंव्हा आपल्यावर हल्ला करायला येतो, तेंव्हा राजानं जे करायला हवं, तेच आपण करावं ! महाराज म्हणून आपणच हा निर्णय घ्यावा.'' असे म्हणून भल्लाटकने अन्य मन्त्र्याकडे पाहिले. ते सर्व एकत्रितपणे म्हणाले, ''युद्ध करणं हाच एकमात्र मार्ग आहे.''

''आपल्याला सल्ल्याबद्दल धन्यवाद ! पण मी सुशेमला आणखी एक संधी देऊ इच्छितो.'' अशोक बोलला.

''कसली संधी ?'' प्रधानमन्त्र्याने विचारले.

''सुशेम शान्तपणे परत जाऊन पूर्ववत तक्षशिलाचा राजप्रतिनिधी म्हणून तिथे राहू शकतो.'' अशोक उत्तरला.

''पण राजप्रतिनिधी बनून आपल्या अधीन रहाणं, त्याला शक्य होणार नाही. परत फिरला, तरी तो स्वतःला 'स्वतन्त्र'



म्हणून घोषित करेल. यामुळे इतर लोकही चुकीचा मार्ग निवडतील. अशाप्रकारे देशात अराजक माजून देशच विघटित होण्याची शक्यता आहे.'' एका मन्त्र्याने आपला विचार मांडला.

प्रधानमन्त्र्याने दोन क्षण विचार केला व तो म्हणाला, ''मन्त्र्यांच्या या बोलण्यात अतिशयोक्ति मुळीच नाहीय. अगदी मोजून मापून बोललेत ते ! त्यांची कल्पना नक्कीच सत्यात उतरेल. पण आपल्या राजाचा विचारही उदात्त आहे. सुशेमला ही संधी देण्यातही काही चूक नव्हे. त्यानं तक्षशिलाला परत जाऊन राजप्रतिनिधी म्हणून पहिल्या प्रमाणे तिथला कारभार पहावा. परत गेल्यानंतर स्वतःला 'स्वतन्त्र' म्हणवून काही गडबड त्यानं केली, तर



आपण आवश्यक ती कारवाई करावी.''

अशोकने विचारले, ''तर मग आपण सुशेमला अगोदर हे सारं कसं सुचवू शकू ?''

''ती जबाबदारी मी घेतो ! नगरसीमेवर मुद्दाम तोरणं लावायची व्यवस्था करून स्वागतासाठी मी स्वतः हार हाती घेऊन सुशेमचं स्वागत करीन. एक दोन प्रमुखांशिवाय कोणीही सशस्त्र सैनिक माझ्याबरोबर नको. सुशेमच्या आपोआपच लक्षात येईल की आपली युद्ध करायची इच्छा नाहीय, आपल्याला शान्ति हवीय. जवळ आल्याबरोबर मी त्याच्या गळ्यात पुष्पहार घालीन अन् त्याचं स्वागत करीन. यानंतर मी आपला प्रस्ताव त्याच्या. पुढे मांडीन.'' प्रधानमन्त्री भल्लाटक म्हणाला.

''आपलं धैर्य कौतुकास्पद आहे प्रधानमंत्री ! तरीही मला असं वाटतंय की आपल्या प्राणांना धोका आहे.'' अशोक म्हणाला.

''मी करणार असणारं काम जोखमीचं आहेच, पण मला मारून युवराजाला काय मिळणार ? तसा तर तो त्यांच्याच प्राणाला धोका करू शकेल ! मगध साम्राज्याच्या रक्षणासाठी अन् शान्तीसाठी मी स्वतः बळी जायला तयार आहे. हे कर्तव्य निभावण्यात माझे प्राण गेले, तरी तो आनन्दच असेल मला'', प्रधानमन्त्री म्हणाला.

''आपली राजभक्ती स्तुतिपात्र आहे. आपलं साहसही जयप्रद व्हावं, अशीच माझी इच्छा आहे.'' अशोक कौतुकाने म्हणाला.

सुशेम नगराजवळ पोचण्यापूर्वीच प्रधानमन्त्री भल्लाटक नगरद्वाराजवळ पोचला. पुष्पहार हाती घेऊन, सुशेम दिसताच तो पुढे झाला.

नगर जसजसे जवळ येत गेले, तसतसा इकडे सुशेमचा क्रोध वाढतच होता. साथीदारांना तो म्हणाला, ''मी राजवाड्यात जाऊन स्वतः सिंहासनावर बसेपर्यन्त वाटेत जे कोणी अडथळा आणतील, त्या सर्वांची सरळ कत्तल करा. अगदी तुकडे तुकडे करून टाका.'' सैनिकाना सावध करत घोड्यावर आरूढ होऊन तो एकाद्या वादळासारखा तो पुढे घुसला.

सुशेम द्वारात आल्याबरोबर हार उंच उंचलून स्वागतासाठी त्याला थांबवायचा भल्लाटकने प्रयत्न केला. क्षणभर थांबून सुशेम ओरडला, ''दुष्टा, तू इथेच आहेस ?'' अन् असे म्हणून ताबडतोब त्याने आपली तलवार चालवली.





''युवराज ! थांबा !'' असे काहीसे प्रधानमन्त्री म्हणू पहात होता, परंतु पहाता पहाता सुशेमच्या तलवारीने त्यांचे मस्तक धडावेगळे केले. मस्तक भूमीवर पडले.

प्राकाराला लागून असलेल्या भवनाच्या वरच्या भागात उभ्या असलेल्या दलनायक प्रधानमन्त्र्याच्या पुत्राने हे पहाताच ताबडतोब आज्ञा दिली अन् प्रवाहाच्या तुटल्या बांधावरून येणाऱ्या लोंढ्याप्रमाणे पुढे घुसून सैन्याने सुशेम व त्याच्या सैन्याला घेरले-सुशेम पाऊलभरही पुढे सरकू शकला नाही. प्रधानमन्त्र्याच्या दलनायक पुत्राने सुशेमचे मस्तक कापले. तक्षशिलाहून आलेले सैन्य ताबडतोब शरण आले. क्षमा मागून ते मगधसेनेत सामील झाले.

शांतीला इच्छुक असणाऱ्या अन् निःशस्त्र उभ्या असणाऱ्या आपल्या प्रधानमन्त्र्याच्या अशा प्रकारच्या हत्येमुळे अशोकला अपार दुःख झाले. त्याच्या स्थानावर अशोकने रथगुप्तची नेमणूक केली. आता कोणीच शत्रु न उरल्याने राज्यात शान्ति-सुखाची स्थापना झाली. अशोकने प्रजेच्या सुखसोयींची सर्व व्यवस्था केली. कसलीही कमरता उरु दिली नाही. जनतेलाही अशोकची शासनपद्धती फार आवडली वृद्ध जन म्हणत की-अशोक राजा चंद्रगुप्त इतकाच समर्थ आहे.

अशोकच्या राज्याभिषेकासाठी ज्योतिष्यांनी एक शुभ मुहूर्त काढला. पण याबाबत एक अडचण उभी राहिली. विदीशादेवी बौद्धमताची होती. दरबारी पुरोहितांनी तिला महाराणी म्हणून स्वीकारायला यासाठी तयारी दर्शविली नाही की, तिचा हिन्दुधर्म साम्प्रदायात विश्वास नव्हता. याशिवाय अगदी अलिकडेच ती फार आजारी होती. इतक्या दूरचा प्रवास धोक्याचा असल्याने तिला वैद्यांची अनुमती नव्हती. पण हे विचारात घेऊन राज्याभिषेक टाळणेही अशक्य होते. ज्योतिष्यांनी जोरदार प्रतिपादन केले की, असा मुहूर्त पुन्हा पाच वर्षानींच लाभू शकेल. पण राणीवाचून अभिषेक करणेही अशक्य आहे.

ही सर्व सत्यपरिस्थिति ध्यानात घेऊन रथगुप्त अशोकला म्हणाला, ''महाराज, मी घाई करत असल्याबद्दल मला क्षमा करा. विदीशादेवींची तब्येत ठीक नसल्याचे आपण जाणताच. आपले पुत्र युवराज महेन्द्र यांनाही बौद्ध धर्माचे सिद्धान्तच शिकवले जात आहेत. ज्या पुत्राला युद्धाबद्दल आस्था नाही,



तो पुढे राज्यरक्षण कसे करू शकेल याचा आपणच विचार करावा, राज्य वीरभोज्य असते, हे आपणाला ठाऊक असेलच. राज्याचं भविष्य ध्यानात घेऊन आपण दुसऱ्या एकाद्या कन्येशी विवाह करणंच अुचित ठरेल. याशिवाय अन्य उपाय मला सुचत नाही'' आपल्या या विनन्तीचा त्याने आग्रह धरला व शेवटी दुसऱ्या विवाहाला अशोकने मान्यता दिली. विवाह झाला व काही दिवसांनीच ज्योतिष्यांनी ठरवलेल्या मुहूर्तावर अशोकचा राज्याभिषेक थाटामाटाने साजरा झाला.

परन्तु अशोक विदीशा व आपल्या दोन्ही अपत्यांना विसरू शकला नाही. विदीशा व मुलांबद्दल त्याला काळजी वाटू लागली. हळुहळु त्याची काळजी वाढत गेली. व शासनसंबंधी कामातली त्याची आसक्तीही घटत गेली.

अशोकचा हा रोख पाहून प्रधानमन्त्र्याने सेनापतीचा सल्ला विचारला, तो सेनापतीला म्हणाला, ''आपले महाराज नेहमी आपली प्रथम पत्नी विदीशा हिच्याबद्दल विचार करत असतात. राज्यकारभाराबद्दल अुदासीन असतात. असंच होत राहिलं अन् सिंहासनाचा त्याग करून परत अुज्जयिनीला जाऊन ते शान्त जीवन जगू लागले. तर आश्चर्य करण्याजोगं नव्हे. आता आपलं कर्तव्य म्हणजे त्यांच्यांत राज्यविस्ताराची आकांक्षा जागवायला हवी, अधिकाराची आग भडकायला हवी, विजयोत्साह अुत्पन्न व्हायला हवा. युद्धात विजय प्राप्त करण्यानेच राजाचा उत्साह वाढतो. शत्रु-राजाला जिंकण्यात जो आनंद कोणत्याही राजाला मिळतो, तो वर्णनातीत, अद्भुत अन् अनिर्वचनीय असतो.'' प्रधानामन्त्री रत्नगुप्त सेनापती वीरसिंहला म्हणाला.

''आपले विचार योग्यच वाटतायत. संधी पाहून राजामधे राज्यविस्तारची ज्योत जागवायला हवी.'' सेनापतीनेही पाठिंबा दिला.

याच सुमारास अशी बातमी मिळाली की, कलिंग देशचा राजा अनौरस मृत्यु पावला आहे. केवळ काही अुच्चपदस्थ अधिकारीच तेथील कारभार पहात आहेत.

कलिंगवर आताच हल्ला केला तर तो देश आपल्या राज्याला जोडून घेण्याची ही अुत्तम संधी आहे, असे प्रधानमन्त्र्याला वाटले. राजाचा अुत्साह वाढवून राज्यकारभारात

त्याचे लक्ष गुंतवण्याची ही नामी संधी आहे असेही त्याला वाटले. ही गोष्ट अशोकच्या कानी घालायची योग्य वेळ तो पहात राहिला.

एके दिवशी संध्याकाळी अशोक अुद्यानात फिरत असता प्रधानमन्त्री त्याला म्हणाला, "महाराज, आपले पिता महाराज बिंदुसार अन् महाराज चन्द्रगुप्त कलिंग देश जिंकायचं स्वप्न पहात असत. पण ते साकार होअु शकलं नाही. कलिंग एक सुसंपन्न देश आहे. बाली, सुमात्रासारख्या देशांशी त्याचा व्यापार चालू असतो. त्या एका राजाशी अनेक देशच्या राजांचे मैत्रीपूर्ण संबंध चालू असतात. त्यांच्यात एकतेची भावना सुदृढ आहे. आता या देशाला राजाच नसल्याने शासकांमधे बेबनाव होण्यांची शक्यता आहे. देश विच्छिन्न होण्याची शक्यता आहे. कलिंग जिंकायला यापेक्षा अुत्तम संधी दुसरी नाही."

सेनापतीही इतक्यात तेथे आला.

अशोकने मन्त्र्याने बोलणे ऐकले, पण काहीच अुत्तर दिले नाही गप्प राहून तो विचार करत राहीला.

"आपलं सैन्य दीर्घकाळ कुठे लढलंच नाहीय. असंच चालू राहिलं तर सैनिक आळशी बनायचा धोका आहे. सैन्याला नेहमी युद्धाचे शिक्षण मिळत रहायला हवं. त्या अभावी शत्रूशी सामना करायची त्यांची शक्ती नाहीशी होण्याची शक्यता आहे." अधून मधून लढायची संधी मिळाली तर सैन्याचं बळ वाढतं." सेनापती अशोकचा उत्साह जागवायचा प्रयत्न करू लागला.

"ठीक आहे, कलिंगवर चढाई करण्यासाठी जरूर ती तयारी सुरु करा. प्रथम आपले गुप्तहेर कलिंगमधे पाठवून त्यांच्या सैन्याचे बळ, त्यांची संख्या, त्यांची शस्त्रं वगैरेबद्दल माहिती मिळवा. नंतर त्यांच्या शासकांमधे दुही माजवायचे प्रयत्न सुरु करायला हवेत. आता ताबडतोब कामाला लागा." अशोक बोलला.

"अशी आज्ञा महाराज, आपल्या आज्ञेचं पालन अवश्य होईल." प्रधानमन्त्री अुत्साहाने म्हणाला. आपली मात्रा बरोबर लागू पडल्याने त्याला आनन्द झाला.

कलिंगवर चढाई करण्यासाठी मगध सन्नद्ध होअू लागला.

**क्रमशः**





# सत्कारयोग्य

**वि**क्रमराजाला निराशेचा स्पर्शही झाला नाही. आपल्या प्रयत्नात असफल होत राहूनही थकला नाही, आपल्या कर्तव्य पालनात त्याने कसलीही कसर ठेवली नाही. त्याचा उत्साह तत्परता अुलट द्विगुणीत होत राहिली. पुन्हा झाडाजवळ जाअून त्याने शव खाली अुतरवले व ते खांद्यांवर टाकून तो पुन्हा मूकपणे स्मशान तुडवू लागला. तेव्हां प्रेतातला वेताळ बोलू लागला, "या भयानक अन्धारात डोळ्यात बोट घालूनही काही दिसत नसताना, तू इतके कष्ट का झेलत आहेस ? इतके कठोर परिश्रम कशासाठी चालवले आहेस ? शेवटी असं कोणतं ध्येय तुझ्यासमोर आहे, की जे साधण्यासाठी इतका आटापिटा चालवला आहेस ? राजनैतिक विषयात सल्ला देण्यासाठी राजाजवळ मन्त्री असता, युद्धक्षेत्रात सहाय्य करण्यासाठी सेनापती असतो, ऐहिक अन् आध्यात्मिक

# वेताळ कथा



चिंतनाबाबत शंका अुपस्थित होतात, तेंव्हा शंका निरसनासाठी त्यांच्याजवळ पंडीत-लोक असतात. माझी खात्री आहे कि तुझ्या दरबारात अशा दिग्गजांची कमतरता नसेलच. पण त्यातही काही नक्कीच असे असतील की जे स्वतःचा स्वार्थ साधण्यासाठी कसलाही आधार नसलेल्या समस्या अुकरून काढतात अन् संतुष्ट होतात. त्यासाठी ते चित्रविचित्र परिस्थिती निर्माण करतात अन् तऱ्हेतऱ्हेचे अुपद्व्याप करतात. मला शंका आहे, की तूही अशा एखाद्याच्या दुष्प्रभावाखाली हे कृत्य करत आहेस ! माझं बोलणं खरं असेल तर तुला सावध करण्यासाठी पैंतल नावाच्या एका मूर्खाची गोष्ट मी तुला सांगतो. ती ऐकताना तुझा थकवाही थोडा कमी होईल. ऐक नीट,''

आणि वेताळ गोष्ट सांगू लागला-

खूप पूर्वी शतभोज नावाचा एक राजा होता. तो कलाप्रिय असून विविधि विषयातले दर्दी महापंडित त्याच्या दरबारात असत. शतभोज जाईल तिथे आपल्या पंडितांनाही घेअून जाई. फुरसत मिळेल, तेंव्हा तो त्यांच्याशी चर्चा करून आनन्द मिळवी.

त्या राज्यात प्रलोम नावाची एक जागा नैसर्गिक सौन्दर्यासाठी प्रख्यात होती. शतभोज एकदा आपल्या पंडितपरिवारासह त्या ठिकाणी गेला व तेथे त्याने तंबू अुभे करवले. राजा व परिवाराच्या मदतीसाठी गावातले प्रमुख तेथे आले.

गावात पैंतल नावाचा एक मूर्ख रहात असे. 'आपणाला माहीत नाही असा जगात कुठला विषयच नाही' अशी त्याची स्वतःबाबत धारणा होती. गावचे पंडित त्याच्याशी वादविवाद करायला तयार नसत, कारण ते त्याला मूर्ख अन् शुष्क वाद घालणारा समजत असत. त्याची बडबड ते शान्तपणे ऐकून घेत. पण यामुळे पैंतल असे समजू लागला की, आपल्याइतका बुद्धिमान कोणी नाहीच.

पैंतलची प्रमिला नावाची एक अतिशय देखणी बहीण होती. जणू देवलोकांतून अप्सराच उतरून आलीय ! गावचे अनेक तरुण तिच्याशी लग्न करायचे स्वप्न पहात असत. ते सर्वजण पैंतलशी गोडगोड बोलून त्याला खूश करण्यासाठी स्तुती करून खूप चढवून ठेवत. त्यामुळेही पैंतल अधिक गर्विष्ठ बनला. शान्तिभोज महाराज गावाबाहेर डेरे ठोकून असल्याची खबर पैंतलला मिळाली.



त्यांच्याबरोबर त्यांचा पंडित लोकांचा ताफाही असल्याचे त्याला कळले. तो ताबडतोब जाअून पंडितांना भेटला आणि म्हणाला, ''हे पंडितहो ! आमच्या गावच्या पंडितांनी एकमताने ठरवलं आहे, की गावात माझ्याइतका विद्वान अन्य कोणीच नाही. सर्व युवक माझी खूप स्तुती करतात. जीवनात मी खूप काही मिळवलं, पण माझी एक इच्छा अुरलीय. ती इच्छा म्हणजे दरबारी पंडितांकडून माझा सत्कार व्हावा.''

पंडितांनी त्याला खरोखरच मोठा पंडित मानून त्यांना माहीत असलेल्या शास्त्रांबद्दलचे काही प्रश्न विचारले, त्याची परीक्षा घेतली. पैंतलने दिलेली अुत्तरे ऐकून ते म्हणाले, ''तू तर अगदीच मूर्ख आहेस. तुझी चेष्टा करण्यासाठीच गावचे लोक तुझी स्तुती करत असतील !'' अन् नंतर त्याची बऱ्यापैकी टिंगल केली.

पैंतल यामुळे रागावला. तो म्हणाला, ''आजपर्यंत कुणी कधीच माझी परीक्षा नाही घेतली अन् कोणी अशी टवाळीही केली नाही. मी फक्त 'आपला सत्कार करा' इतकंच म्हटलं होतं. मला प्रश्न विचारा, असं थोडंच म्हटलं होतं ? तुम्हाला तर इतकंही ज्ञान नाहीय. मला तर हेच समजत नाहीय, की तुमच्यासारख्या अज्ञानी लोकांना राजानं दरबारात स्थानच कसं दिलं आहे !'' त्याच्या या तिखट बोलण्याचा पंडितांना जराही राग आला नाही. ते शान्तपणे म्हणाले, ''बंधो, तुझ्या या प्रश्नांना उत्तर आम्ही देअू शकत नाही. शेजारच्या तंबूत खुद्द महाराज आहेत. त्यांनाच जाअून विचार ना.''



अशा प्रकारे पैंतल राजाला भेटू शकला. शतभोजच्या सुन्दर रूपावर मोहित होअून तो म्हणाला, ''महाराज, तुम्ही कित्ती छान दिसताय ! पण आपण आपल्या दरबारात असल्या अयोग्य लोकांना का बरं स्थान दिलंत ?''

त्याच्या बोलण्यावरून पैंतल बुद्धिहीन व मूर्ख असल्याचे शतभोज राजाने ओळखले. तो म्हणाला, ''माझ्या पंडितांमधे काय दोष दिसला सांग बरं ?'' त्याच्या बोलण्यात कुतूहल होते.

''त्यांनी माझा सन्मान करायला नकार दिला, हाच तर त्यांचा अवगुण ! त्यांना चांगला धडा द्या अन् माझ्या सत्कार करवा, नाहीं तर त्यांना दरबारातून हाकलून द्या.'' पैंतल स्पष्ट शब्दात बोलला.

“आता तू म्हणालास, तसं मी केलं नाही, तर काय करशील तू ?” राजा शतभोज त्याला जास्तच चिडवत विचारू लागला. काय अुत्तर द्यावे, हे लगेच पैंतलला समजेना, तो काही विचार करण्यापूर्वीच राजा म्हणाला, “बोल ना, विचारात का पडलास ? मी तुझं ऐकलं नाही, तर काय करशील तू ?”

गावचे तरुण कधी कधी त्याला चिडवताना असले प्रश्न विचारात असत, अन् अशा वेळी त्यांना धमकावत तो म्हणे की, ‘आपल्या बहिणीचं लग्न तुझ्याशी करून देणार नाही.’ अन् मग ते त्याचे ऐकत असत. हे सारे आठवून पैंतल अुत्तरला, “मी काय करीन हे नाही सांगणार, पण काय करणार नाही ते मात्र सांगतो ऐका. माझं बोलणं ऐकलं की बास, खुद्द महाराजही ताळ्यावर येतील !”

“ठीक आहे. सांग तर !” महाराज म्हणाले.

“तर मी आपल्या बहिणीचं लग्न तुमच्याशी करून देणार नाही. समजलं ?” पैंतलची ही धमकी ऐकून शतभोज हसू लागला. पण असल्या भावाची बहीण आहे तरी कशी-असे कुतुहल राजाच्या मनात जागे झाले. तीही मूर्ख असेल तर तिच्याशी बोलून थोडी करमणूक करून घ्यावी अशा उद्देशाने राजा म्हणाला, “तुझ्या बहिणीला एकवार पाहीन मी अन् मग तुझ्या सत्काराबद्दल विचार करीन. ठीक आहे ?”

पैंतलने आपली कबुली दिली. शतभोज त्याच्या घरी गेला अन् त्याची बहीण प्रमिला हिचे सौन्दर्य पाहून तो अवाकच झाला ! देवलोकीची अप्सराही हिच्यापुढे कोणीच नाही, असे त्याला वाटले. थोडा वेळ तिच्याशी गप्पागोष्टी केल्यानन्तर राजाच्या लक्षात आले की, ती काही आपल्या





भावासारखी मूर्ख नाहीय. अुलट तिचे व्यवहारज्ञान वाखाणण्याजोगेच आहे !

“तुझ्यासारखी सुन्दर कन्या महाराणी बनावी हेच न्याय्य होईल. माझ्याशी विवाह करणं पसन्त आहे का तुला ?” शतभोजने तिला विचारले.

पण मधेच हस्तक्षेप करत पैंतल म्हणाला, “महाराज ! आधी आपल्या दरबारी पंडितांकडून माझा सत्कार करवा, अन् मगच विवाहाच्या गोष्टी बोला. कबूल ?”

शतभोज म्हणाला, “आम्हा दोघांना हा विवाह मान्य असल्यावर मधे पडणारा तू कोण ? हवं तर थोडंफार धन देईन, त्यात संतुष्ट रहा. अुगीचच कसल्यातरी मागण्या करून स्वतःचा जीव धोक्यात घालू नकोस.”

पण राजाला परावृत्त करत प्रमिला म्हणाली, “महाराज, हा माझा सख्खा मोठा भाऊ आहे. त्याची इच्छा काही ‘फार मोठी इच्छा’ म्हणता येणार नाही. आपणासाठी तर हे असाध्य नव्हेच. आपणाला जर सहर्ष, हृदयपूर्वक स्वीकार करायचा असेल, तर माझ्यासाठी एवढंही नाही करू शकणार ?”

शतभोजला तिचे म्हणणे योग्यच वाटले. तिची विनन्ती त्याने मान्य केली. तंबूत परतल्यावर त्याने पंडितांना पाचारण केले अन् घडलेले सर्व सांगितले, नंतर तो म्हणाला, “प्रथमदृष्टीतच प्रमिला मला फार सुन्दर वाटली. आम्हा दोघांचं लग्न व्हावं यासाठी मला तुम्हा लोकांची मदत हवी.”

पंडीत तर एकमेकांच्या तोंडाकडे पाहू लागले. त्यांच्या मनात आले की- आपल्यासारखे महान् पंडित जर पैंतलसारख्या मूर्खाचा सत्कार करतील, तर जग महाराजांच्या कलाप्रेमाला हसणार नाही का ? एका स्त्री साठी राजाचं असं पतन सर्व प्रकारे अपमानजनक नव्हे का ?





'आपणाकडून हे घडणार नाही' असे पंडितानी राजाला कळवले. असं करायला राजाने भाग पाडले तर 'आम्ही सर्वचजण दरबार सोडून जाऊ' असेही ते म्हणाले. शतभोज यावर काहीच बोलू शकला नाही. प्रमिलाला तो विसरूही शकेना. मनातल्या मनात तो दुःखी राहिला. प्रमिलाला हे समजल्यावर तिने परिवाराला आपणाकडे बोलावून घेतले. सर्वांना उद्देशून ती म्हणाली, "आपण महापंडित आहात असं ऐकून आहे मी. पण आपलं पांडित्य राजाच्या उपयोगी पडू शकलं नाही, हे फार विचित्र आहे."

चकित होऊन पंडीत म्हणाले, "आमचं पांडित्य नेहमी राजाच्या उपयोगी पडत असतं, मूर्खाच्या बहिणीच्या लग्नाबाबत मात्र ते राजाच्या उपयोगी पडत नाहीय."

प्रमिलाने विचारले, "असं कां बरं ?"

"हा विवाह होणार असेल तर आम्हाला तुमच्या भावाचा सत्कार करावा लागेल. अयोग्य व्यक्तीच्या सत्कार करणं हा पंडिताचा धर्म नव्हे !" ते उत्तरले.

"मी शाबित करून दाखवीन की तो सत्कार-योग्य आहेच. मग करता सत्कार ?" प्रमिलाने विचारले.

"तुमच्या भावाला तर कसल्याच विषयाचं ज्ञान नाहीय. त्याची योग्यता कशी शाबित करू शकाल तुम्ही ?" पंडितांनी प्रश्न टाकला.

प्रमिला हसत म्हणाली, "त्याची योग्यता सिद्ध करण्यासाठी तो एकाद्या क्षेत्रात ज्ञानी असावा, याची आवश्यकता नाहीय. माझं व्यवहारज्ञानच त्यासाठी पुरेसं आहे." यानंतर विवाहासाठी इच्छुक असणाऱ्या अनेक राजकुमारांनी तिला दिलेल्या वस्तु तिने पंडितांना दाखवल्या. सर्व वस्तु निरनिराळ्या डब्यांमधे ठेवलेल्या होता.

एका पेटीत कडुलिंबाची एक काडी होती. एका युवकाने ती प्रशान्त देशातून पाठवली होती. तिथे चंदन खूप मिळत असे. प्रत्येक कामासाठी त्याचा उपयोग केला जाई. पण कडुनिंब क्वचितच आढळत असे. तेंव्हा तिथे ही काडी फार मूल्यवान मानली जाते.

दुसऱ्या एका डबीत एक तांब्याची अंगठी होती. त्या देशात खूपशा सोन्याच्या खाणी होत्या. स्वयंपाकाची भांडीही तिथे सोन्याची असत. पण दागिन्यासाठी तिथे सोनं वापरत नसत. त्याऐवजी तांब्याचा उपयोग केला जाई. तेच मूल्यवान मानले जाई. तांब्यावर



चटकन डाग पडतात म्हणून तिथे मिश्रणांचा शोध लावला गेला. तांब्यात थोडंस सोनं मिसळतात. ही तसलीच अंगठी आहे. आपल्या सोन्याच्या अंगठीपेक्षा त्या देशात या तांब्याच्या अंगठीचेच मूल्य अधिक ."

आणखी एका पेटीत एक सुन्दर दिसणारा कोळशाचा स्फटिक होता. त्या देशात पाहू तिथे हिरेच हिरे असत, पण कोळसा फार कमी मिळे. त्यामुळे तिथे या स्फटिकाचे मूल्य हिऱ्यापेक्षाही अधिक असे.

प्रमिलाने अशा सर्व वस्तु दाखवल्या. रेशमी वस्त्रांहूनही मूल्यवान अशी हातमागाची वस्त्रे दाखवली. उत्तम चित्रकलेच्या नमुन्यांपेक्षाही महत्वपूर्ण व प्रभावशाली मानल्या गेलेल्या केवळ वाकड्या तिकड्या रेघा ओढलेली चित्रे दाखवली. असल्या मूल्यवान वस्तु पाहून पंडितांना अचंबा वाटला. "असल्या वस्तुंचं वैशिष्ट्यच फक्त आम्ही कधी-कधी ऐकलं होतं, पण प्रत्यक्ष अशा वस्तु पहाण्याचं भाग्य आम्हाला तुमच्याकडेच लाभलं. फार भाग्यशाली आहात तुम्ही !"

"आपण सर्व तर महापंडित आहात-आता तरी माझ्या भावाचं मूल्य ओळखा. त्याचा सत्कार करून महाराजांशी माझा विवाह घडवून आणा." प्रमिलाने विनन्ती केली.

"तुमचं बोलणं तरीही विचित्रच वाटतंय. केवळ या वस्तु दाखवल्यानं तुमच्या भावाला योग्यता कशी प्राप्त होणार ? जरा खुलासा करा बरं ?" पंडित बोलले. प्रमिला हात जोडून म्हणाली, "महाशयहो ! आपण पंडित, प्राज्ञ आहात. माझी परीक्षा



घेण्यासाठीच मला असं विचारत आहात. माझी खात्री आहे की, माझा आशय तुमच्या ध्यानात नक्कीच आला असावा." प्रमिला नम्रतेने बोलली.

पंडित ताबडतोब विचारात पडले. एक-दोन क्षणांनन्तर एक वृद्ध पंडित हसत तिच्या डोक्यावर हात ठेवून आशीर्वाद देत म्हणाला, "मुली, तुझ्या बोलण्यानं आमचं गर्वहरण झालंय. एका मूर्खाचा सत्कार का व कसा करावा हे आम्हाला समजलं असतं, तर महाराजांना क्षणभरही दुःख वाटलं नसतं. मूर्खाच्या सत्कार-योग्यतेबद्दल आजवर इतकं चमत्कृतीपूर्ण कोणी बोललंच नाही. तुझ्यासारखी बुद्धिमान स्त्री महाराणी बनणं, हे प्रजेचं सौभाग्यच ! आम्ही आता निश्चय केलाय की तुझ्या भावाचा सत्कार

करावाच.'' अन् त्याने अन्य पंडिताकडं पाहिले.

प्रमिला सर्व चमत्कारिक वस्तु दाखवून काय सांगू इच्छितेय हे सर्व पंडितांनी ओळखले. मस्तक हलवून सर्वांनी टाळ्या वाजवल्या.

इतकी गोष्ट सांगून वेताळने विक्रमराजाला विचारले, ''राजा मूर्खही सन्मानयोग्य असतो, असे पंडितांनी मान्य केले. शतभोजच्या दरबाराच्या असल्या पंडितांबद्दल काय बोलावं ? असं वाटतंय की, प्रमिलेशी विवाह न करता येण्याबद्दलचं राजाचं दुःख पाहूनच केवळ त्यांनी त्याला खूश करण्यासाठी एका मूर्खाचा सत्कार करणं मान्य केलं असावं. मूर्खतेला मान देणं, म्हणजे पांडित्याचा अपमानच की ! काहीही असो, अडचण लवकर सोडवण्यासाठीच या पंडितांनी निष्कारण हा असंबद्ध, अन्याय्य निर्णय घेतलाय. प्रमिलानं आपल्या भेटी दाखवून पंडितांना काही सांगायचा प्रयत्न केला का हे मला जाणायचं आहे. का तिनं त्यांना फक्त भ्रमात टाकण्यासाठीच हा डाव रचून पाहिला ? वृद्धानं तर तिच्या चमत्कृतिपूर्ण बोलण्याची वाहवा केली अन् इतरांनी माना हलवून पाठिंबा दिला. हे सर्व काही हास्यास्पद नव्हे का ? अुत्तरं माहीत असूनही गप्प राहिलास, तर तुझ्या मस्तकाचे तुकडे-तुकडे होतील.''

विक्रम अुत्तरला, ''क्वचित आढळणाऱ्या वस्तु जगात सर्वांनाच आकर्षक वाटतात. आकर्षणाचा अर्थ असतो प्रशंसनीय अन् मूल्यवान. निरनिराळ्या देशात अत्यन्त मूल्यवान, पण आपल्या देशात अगदीच मूल्यहीन वस्तु दाखवून प्रमिलाने काहीशा विचित्र पद्धतीने सांगितले की, क्वचितच आढळणाऱ्या महापंडितां प्रमाणेच अगदी दगडासारखे मूर्ख ही सन्माननीयच असतात. वृद्ध पंडिताच्या ध्यानात आले की मूर्खाचा सत्कार करून आपण त्याचा मूर्खपणा मोठा करून दाखवणार आहोत. त्यामुळेच त्याने हे सत्यही घोषित केले की, प्रमिलासारखी विवेकी स्त्री महाराणी बनली तर प्रजा जास्तच सुखी होईल.''

अशा प्रकारे राजाचे मौन भंग करण्यात सफल झालेला वेताळ प्रेतासह गायब होअून पुन्हा झाडावर जाअून बसला.





*समुद्रकिनाऱ्यावर सहल - २६*

# सुन्दरबन व त्याच्यापुढे

शब्दांकन : मीरा नायर ◆ चित्रकला : गौतम सेन




कलकत्त्याहून आपण अच्छीपुर (अच्छीघाट) येथे रवाना होअू. भारतात चिनी लोकांची पहिली वस्ती १८४० च्या दशकात इथे वसली होती. म्हणून हा भाग 'चायना टाअून' नावाने प्रसिद्ध आहे. हुगळी किंवा गंगा दक्षिणेकडे वळताना डायमंड हार्बर येथे तिचे पात्र खूपच रुन्द होअून नदी मुख निर्माण होते. एके काळी ईस्ट इंडिया कंपनीची जहाजे येथे नांगरली जात असत, पण आता तर प्रवाशांची ने आण करणाऱ्या मोटार-बोटी किंवा देशी नावाच फक्त याचा अुपयोग करतात.

डायमंड हार्बरच्या दक्षिणेला जगातील सर्वात मोठा त्रिभुज-प्रदेश आहे. गंगा व त्याच्या पूर्वेकडील ब्रह्मपुत्रा नद्यांच्या असंख्य लहान-मोठ्या प्रवाहांनी हा निर्माण झाला आहे. या नद्यांतून वाहून येणाऱ्या अवाढव्य गाळामुळे येथे नवी जमीन व बेटे फार झपाट्याने तयार होत असतात. विशेषतः त्रिभुज प्रदेशाच्या पूर्व भागात- समुद्राच्या दिशेने.

त्रिभुज प्रदेशात कलकत्त्यापासून बंगाल अुपसागरापर्यन्त विशाल असे भरतीचे जंगल व दलदलीचे प्रदेश आहेत. याचे क्षेत्रफळ १५,००० वर्ग किमी. असून हे जगातील सर्वात मोठे गरान (दलदली जंगल-मॅनग्रोव्ह) आहे.

या जंगलाचे नाव आहे-सुन्दरबन याचे दोन अर्थ आहेत - १ सुन्दर जंगल व २ सुन्दरी नावाच्या वृक्षांचे जंगल. एक-प्रकारे सुन्दरबन हे कलकत्त्याचे फुप्फुस आहे, कारण की ते कलकत्त्याला ऑक्सिजनचा पुरवठा करते. हे वन नैसर्गिक बांधाचे कामही करते. ही गरानवने नसती, तर भरतीच्या वेळी अुठणाऱ्या अुत्तान समुद्री लाटांनी कलकत्ता शहर गिळून टाकले असते.

मुखवटा घातलेले कोळी



प्राणीजन्य प्रकाश देणाऱ्या करोडों सूक्ष्म जीवांमुळे-काजव्यांमुळे-थंडीच्या दिवसात रात्री हे जंगल झगमगत्या परीलोकासारखे भासते. या गरानवनातल्या वृक्षांची भाल्यांसारखी टोकदार मुळे पाण्याच्या वर येऊन ऑक्सिजन शोषतात. नावाडी हे भाले चुकवत सावधगिरीने आपल्या नावा चालवतात. खाऱ्या दलदली भागात सुन्दरी, गोडान, गेरुवा व धुंधुल वृक्ष व केवा गवत अुगवते.

इथे आढळणाऱ्या वन्यजीवांइतके विविध प्रकारचे जीव एकत्रितपणे जगात अन्यत्र क्वचितच पहायला मिळतील. ऐटबाज रॉयल बंगाल टायगर, भयंकर मगरी-सुसरी, शार्क मासे, दुर्लभ अशा सॉल्हेटर पाली, तन्हतन्हेचे पक्षी, घोरपडी, मासे, कासवे साप, मधमाश्या खेकडे गोगलगायी व कित्येक जातीचे कणा असलेले व नसलेलेही प्राणी इथे रहातात. सुन्दरबनातल्या वाघांची संख्या ३०० ते ५०० पर्यन्त आजमावलेली आहे. जगातल्या अन्य कोणत्याही प्रदेशात वाघांची इतकी जास्त वस्ती नाही. जमीन पाणी दोन्हींवर रहायची या वाघांना सवय आहे, ते लांब अंतर पोहू शकतात. मध व मासे पकडण्याचा व्यवसाय करणारे सुन्दरबनातले रहिवासी असे मानूनच चालतात की, आपल्यावर केव्हाही वाघाचा हल्ला होअू शकेल. यापैकी कित्येक तर, डोक्याच्या मागील बाजूस चेहऱ्याचा मुखवटा लावतात. कारण असे मानले जाते की वाघ सहसा माणसावर समोरुन हल्ला करत नाहीत. जंगलात शिरण्यापूर्वी ते वाघांची देवता व वनांचा अधिष्ठाता 'दक्षिणी राय' याचे स्मरण करून आशिर्वाद मागतात.



दोन 'रॉयल बेंगाल टायगर'

सुन्दरबनात मनमानी जंगलतोड होत असे. शेवटी त्याला 'संरक्षित भाग' जाहीर करण्यात आले. हॅलिडे, सजनाखाली व लोधियन या द्वीपाना 'अभयारण्य' बनवले आहे. १९७२ मध्ये व्याघ्र परियोजना (टायगर प्रॉजेक्ट) सुरु झाली, वाघांच्या शिकारीवर बन्दी घालण्यात आली आणि त्यांच्या अुध्वस्त होत जाणाऱ्या निवासस्थळाच्या रक्षणासाठी पाअूल अुचलले गेले. १९८४ मधे या गरानवनांना राष्ट्रीय-अुद्यान व व्याघ्र अभयारण्य बनवले गेले. वैज्ञानिक पद्धतीने व्यवस्था करण्यात आलेले व 'विश्व-वारसा' म्हणून स्थान मिळालेले सुंदरवन हे जगातील पहिलेच गरानवन होय.

गंगेच्या तोंडाशी सुन्दरबनात जी १०२ बेटे आहेत. त्यातील सर्वात मोठे म्हणजे सागर-द्वीप. इथले जवळजवळ सगळेच गरान वन तोडले गेले होते. कवि रवीन्द्रनाथ नेहमी इथे फिरायला येत. त्यांनी आपली बरीचशी साहित्यिक पत्रे व गीते इथेच लिहीली असे म्हणतात.

बेटाच्या दक्षिण टोकाला गंगासागर म्हणतात. मकर संक्रांतीच्या (१४ जानेवारी) दिवशी हजारो हिन्दू तीर्थयात्री इथे गंगेत स्नान करतात. स्नानानंतर ते कपिलमुनींच्या दर्शनाला जाअून पूजा करतात. हा मेळा तीन दिवस भरतो.

१८२४ मधे स्थापना करण्यात आलेला एक दीपस्तंभ येथे असून अजूनही तो अुपयोगात आणला जातो. समुद्रसपाटीपासून हा ३६ मीटर अुंच आहे. स्वच्छ वातावरणात याचा प्रकाश १६ कि.मी. दूरवरून दिसू शकतो.

कलकत्त्या पासून १,००० कि.मी. अंतरावर बंगाल अुपसागरात पोर्ट ब्लेअर ही अन्दमान निकोबारची राजधानी आहे. हा द्वीपसमूह भारताच्या पूर्वकिनाऱ्याला समांतर असून मधे मधे तुटलेल्या पट्टी-प्रमाणे ७८० किमी. लांबीत धनुषाकार पसरलेला आहे. सर्वात अुत्तरेकडील बेट लॅण्डफाल्क हे मियान्मारपासून १९० कि.मी. वर आहे व सर्वात दक्षिणेकडील बेट ग्रेट निकोबार पासून इण्डोनेशिया केवळ १५० कि.मी. वर आहे.

असे म्हणतात की अन्दमान हे नाव हुण्डुमान या शब्दापासून बनले आहे. मलय लोकांना या द्वीपांचा दीर्घकाळापासून परिचित असून, ते यांना 'हुंडुमान' म्हणत असत. त्यांच्या भाषेत रामायणातील हनुमान

गंगासागर वरील कपिलमुनीचे प्रसिद्ध देवालय





अंदमानी

यात्रे हे नाव आहे. (मियान्मारपासून इण्डोनेशिया व कंबोडियापर्यन्त रामकथा खूप प्रचलित आहे.)

निकोबारला पुराणकालापासून नक्कवरम् (नंग्यांचा देश) म्हणत असत. इथले मूळ निवासी नंगे (नागडे) रहात असत, म्हणून हे नाव पडले असावे. १५ व्या शतकात पोर्तुगीज इथे आले. ते याला नकुबार म्हणत. त्यावरून पुढे निकोबार झाले.

ब्रिटिश शासनकाळात शिक्षा झालेल्या अपराध्यांना इथे पाठवले जाऊ लागले. १८५७ च्या बंडात भाग घेणाऱ्या हजारो सैनिकांना व राजबंद्यांना येथे हकनाक मरायला पाठवून देण्यात आले. या बेटांना 'काळे पाणी' असे म्हणत. हे नाव घेताच लोकांच्या अंगावर काटा उभा राही. इथले पाणी काळे व खारे म्हणत असत. अनेक स्वातन्त्र्य सैनिक इथल्या सेल्युलर जेलमधे दीर्घकाल बंद होते.

स्वातन्त्र्य प्राप्तीनंतर नोव्हेंबर १९५६ मधे अन्दमान-निकोबार ला केन्द्रशासित प्रदेशाचा दर्जा दिला गेला.



अंदमानी कोळी मासे पकडत असताना



# गोविन्दची अक्कलहुशारी

गोविन्दने मिठाईचे दुकान चालवून खूप कमाई केली. अजूनही कमवत होताच. रत्नमाला ही त्याची एकुलती एक मुलगी असल्याने तिच्याशी विवाह करणारा त्याच्या इस्टेटीचा एकटाच वारस बनणार होता. त्यामुळे हे नाते जोडण्यासाठी त्याच्याकडे लोक येत रहात.

गोविन्दही योग्य वर शोधण्यासाठी जोरदार प्रयत्न करत होता. त्याने शरदच्या मुलाबद्दल चोकशी केली. सर्व माहिती मिळवल्यानन्तर त्याला हे स्थळ योग्य वाटले. तो शरदला म्हणाला, ''असं पहा, माझी एक लहानशी विनन्ती. आहे. स्थळ पक्कं करण्यापूर्वी तुमचा मुलगा माझ्या घरी आला तर बरं होईल. त्याला मेजवानीला बोलावून मी त्याचा अपमान करणार आहे, असं कृपा करून समजू नका. मला असं करायला एका साधूनेच आदेश दिलेला आहे. तो म्हणाला की मुलाचे जेवण झाले की दुसऱ्याच क्षणी मी तुला मुलगा तुझ्या मुलीला योग्य आहे की नाही याचा निर्णय घेण्याची शक्ती देईन.'' असं झालं की सर्व शुभच होईल असंही साधू म्हणाला.

गोविन्दच्या या बोलण्यावर शरद आश्चर्यात पडला. पण तसे करण्यात नुकसान तर काहीच नाही, अशा विचाराने त्याने मुलाला गोविन्दकडे पाठवले. गोविन्दने दुपारपर्यन्त त्या तरुणाला गप्पात रंगवले. नंतर रुचकर जेवण त्याला वाढले. जेवण झाल्याबरोबर तो म्हणाला, ''बेटा, मला वाटतंय की, माझ्या मुलीचा तुझ्याशी विवाह न व्हावा यातच दोघांचंही कल्याण आहे. आपल्या पित्यालाही हा निरोप दे, त्यांना म्हणावं मला क्षमा करा.''

शरदचा मुलगा निराश झाला. पण करणार काय ? मुकाट्याने तो तेथून निघून गेला.

मीनल नामजोशी



यानंतर आणखी तीन मुलांना गोविन्दने आपल्याकडे जेवायला बोलावले अन् त्यांनाही अयोग्य ठरवून परत पाठवून दिले. तरुणांच्या किंवा त्यांच्या आईवडिलांच्या ध्यानी येईना की, शेवटी गोविन्दला जावयात कसली योग्यता असायला हवी आहे ! त्यांना असेही वाटले की, 'अरे योग्यता पारखायची ही काय रीत झाली ?' ते त्याच्याशी भांडू शकले असते, तरीही अशाकरता गप्प पाहिले की, गोविन्दने त्यांच्या मुलांना भोजनासाठी नेण्याची परवानगी त्यांच्याकडून आगाऊ घेतलेली असे.

एके दिवशी गोविन्दचा स्वतःचा खास मित्र राधाकृष्ण त्याला भेटला. त्याने विचारले, ''हा काय प्रकार आहे गोविन्द ? ऐकलं की तू जावई बनू पहाणारांना घरी बोलावून स्वादिष्ट जेवायला घालतोस ?''

गोविन्द हसन म्हणाला, ''साधूनं मला शपथ घातली आहे की योग्य जावई मिळेपर्यन्त हे सारं गुप्तच ठेव. तेंव्हा आणखी थोडे दिवस धीर धर.''

राधाकृष्णही यावर हसतच म्हणाला, ''ठीक आहे, तसंच होऊदे ! पण हां, सीतापुरला माझी एक बहीण रहाते, हे तुला माहीतच आहे. मला वाटतं, तिचा तिसरा मुलगा तुझ्या मुलीयोग्य आहे. त्याला जेवायला बोलवायचं की नाही, हे तूच ठरवायचं आहेस.''

''बोलावीन तर ! छान मेजवानी देईन. आपण दोघं उद्याच जाऊ अन् मुलगा बरा वाटला तर जेवायला बोलावू.'' गोविन्द म्हणाला.

राधाकृष्णने गोविन्दने म्हणणे मान्य केले. दोघे मिळून सीतापुरला गेले. लग्नाबाबत बोलणी केली अन् जेवायला येण्यासाठी निमंत्रण दिले. रमेशचे आईबाप तर ऐकून चकित झाले. तरीही त्यांनी आपल्या मुलाला जायची परवानगी दिली.

रमेशला घेऊन ते गावात आले, तेंव्हा गोविन्द म्हणाला, ''बेटा रमेश, आज रात्री तू आपल्या मामाकडे रहा. उद्या सकाळीच ये माझ्या घरी.'' नंतर तो राधाकृष्णला म्हणाला, ''आपल्या भाच्याबरोबर उद्या तूही ये जेवायला.

दुसऱ्या दिवशी राधाकृष्ण रमेशला बरोबर घेऊन गोविन्दकडे गेला. गोविन्दने दोघांना पुढच्या खोलीत बसवले अन् खूप वेळ त्यांच्याशी गप्पा मारत बसला. राधाकृष्णच्या



पोटात कावळे ओरडू लागले. तो गोविन्दला म्हणाला, ''खूप भूक लागलीय आता. अजून स्वयंपाक तयार नाही झाला का ?''

त्याची क्षमा मागत गोविन्द म्हणाला, ''जेवण रुचकर बनायला हवं ना, मग उशीर तर होणारच, मधल्या वेळात दोघं एक एक ग्लास दूध घ्या हवं तर !''

पण नकार देत रमेश म्हणाला, ''जेवायच्या अगोदर काहीही न खायची-प्यायची माझी सवय आहे. हवं तर मामांना द्या दूध.''

राधाकृष्णही भाच्याचे समर्थन करत म्हणाला, ''मलाही नकोय दूध.'' अर्ध्या तासाने जेवायला बसायला सांगितले गेले. तीन तऱ्हेची पक्वान्ने, तीन तऱ्हेचे तिखट पदार्थ व पापड आदि तीन ताटात वाढले गेले. दोघांना बसायला सांगून गोविन्द स्वतःही एका ताटासमोर बसला. राधाकृष्ण आपल्या दोस्ताशेजारी बसला.

परन्तु आधी खाली न बसताच रमेश म्हणाला, ''सगळं खूप वाढलंय. स्वादिष्ट तर असेलच, पण मला इतकं सगळं खायला जमणार नाही. अगोदरच थोडं थोडं काढून ठेवलं तर बरं होईल.''

''असं काय बोलतो आहेस ? दगडसुद्धा पचवायचं वय आहे तुझं !'' असं म्हणत गोविन्द पदार्थ कमी करायला नकार देत होता.

पण रमेश हसून म्हणाला, ''कमीच जेवायची सवय आहे माझी. तसं केल्यानं पचनशक्ती जास्त काळपर्यन्त आपलं रक्षण करत रहाते, हे तर आपणही जाणत असालच म्हणा ?''



गोविन्दने सांगितल्यावर त्याची मुलगी रत्नमाला रमेशच्या ताटातले काही पदार्थ काढून घेऊन गेली. आता ताटात वाढले असलेले सारे रमेशने खाल्ले. गोविन्द व रामकृष्ण यांच्याअगोदरच त्याने आपले जेवण संपवले.

भोजन कार्यक्रम संपल्यावर गोविन्दने पानाचा डबा रामकृष्णच्या पुढे केला अन् रमेशला म्हटले, ''पदार्थ आवडले नाहीतसं वाटतंय ?''

उत्तर द्यायला रमेश संकोचत होता. पण नाइलाजाने त्याला म्हणावेच लागले की तीन पदार्थ चवदार नव्हते. अन् त्या त्या पदार्थात काय काय मिसळले असता चांगले बनले असते हे ही सांगितले.

त्याच्या बोलण्यावर खुश होत गोविन्द

म्हणाला, ''रामकृष्ण, साधु माझ्या कानात सांगतोय की, हाच मुलगा माझ्या मुलीसाठी योग्य वर आहे.''

जास्त जेवल्यामुळे जोराने श्वासोच्छ्वास करत रामकृष्ण म्हणाला, ''साधूचं नाव घेऊन तूच काही विचार करू लागलास, हे मी ओळखलंय. सांग काय विचार होते तुझे ? गोविन्द हसतच म्हणाला, ''राधाकृष्ण तू तर जाणतोसच की, मी मिठाईचा व्यापार करतो. मिठायांमधे नेहमी बसणाऱ्याच्या स्वतःच्या खाण्याच्या सवयी नेहमी चांगल्या हव्यात. त्या तुझ्या भाच्यात आहेत. अशा मुलाने माझा व्यापार हाती घेतला, तर तो स्वादिष्ट पदार्थ बनवून अधिक कमाई करील. दुसरा कोणी असेल, तर दुकानात बसून हवं तेव्हा, हाताला जे लागेल, ते खात राहील. तो स्वतःची तब्येत खराब करील अन् दुकानाचंही नुकसान करील. जी मुलं मला आधी आवडली, त्यांची मी याबाबतच परीक्षा घेतली. परमेश्वर कृपेनं मला रमेशसारखा जावई मिळतोय. आता मुलगी अन् व्यापार, दोन्हीही त्याच्या हाती सोपवीन अन् निश्चिन्तपणे उरलेलं आयुष्य घालवीन.''

राधाकृष्ण आश्चर्याने मित्राचे बोलणे ऐकत होता. तो म्हणाला, ''जावयाची निवड केवळ तुझ्याच इच्छेवर अवलंबून आहे, असं समजतोस का तू ? मुलीची स्वतःची अशी काही इच्छाच नाही का ? तिची पसन्तीही विचारायला हवी ना ?''

गोविन्द म्हणाला, ''तुम्हा दोघांचं जेवण संपून तुम्ही बाहेरच्या खोलीत बसलात, तेव्हा आत गेलो होतो, तो रत्नमालाची पसंती विचारायलाच ! तिला हे स्थळ खूपच आवडलंय. आता तुझ्या भाच्याला पसंत आहे की नाही, हे तूच विचार !''

रामकृष्णने रमेशला विचारलो, ''तुझा निर्णय काय आहे ?'' तेव्हा निःसंकोचपणे रमेश म्हणाला, ''काहीही असो. हे मामा खूपच हुशार आहेत. जावई निवडायची त्यांची ही युक्ती मला फार आवडली. त्यांच्या निवडीला मी नकार कसा देऊ ?''

''वा रे वा ! भावी जावयाकडून आपली प्रशंसा करून घेतलीस की गोविन्द ! तुझ्या अक्कलहुशारीच कौतुक करू, तेवढं थोडंच होईल.'' असे हसत म्हणून राधाकृष्णाने गोविन्दाचे अभिनन्दन केले.





ते इंग्रजांशी लढले - झुंजले

४

# पालयक्कारांचे बंड

कथा : मीरा अुग्रा ◆ चित्रकला : गौतम सेन

आक्टोबर १७०८ मधे पांचालंकुरिचीचा पालयक्कार वीर पांड्य कट्टबोम्मन याला फाशी दिले गेले, आणि कंपनीच्या अधिकाऱ्यांनी सुटकेचा निश्वास सोडला !












वीर पांड्यचे दोन भाऊ अन् पंधरा इतर नातेवाईक पालयंकोट्टैच्या किल्ल्यात कैदेत होते. गाववाले तिथे पोचले...



फेरीवाल्यांच्या वेषात......




सरपणाच्या मोळ्यांमधे हत्यांर लपवलेली होती. सूर्यास्त होताच-



अचानक हल्ला करून, पहारेदारांवर कुरघोडी करून कैदी भरकन किल्ल्याबाहेर पडले.





सेवतैयाला पांचालकुरिचीचा नवा पालयक्कार घोषित केले गेले. प्रजा त्याच्या झेंड्याखाली एकत्र झाली.




लवकरच शिवगंगाचा मुरुडु पांड्यन्, डिंडिगलचा गोपालनायक, मालकारचा केरळ वर्मा अन् दुसरे खूपसे सरदार त्यांना येऊन मिळाले







सेवतैयाच्या विजयामुळे धक्का बसून कॉलिन मेकॉलेने तिरुनेलवेलीहून कूच करून पांचालकुरिचीवर हल्ला केला




पण ३१ मार्च, १८०१ ला तो परत आला, अन् याही वेळी त्याला माघारच घ्यावी लागली.

अुम्मीदुरैचे लोक शौर्याने लढले अन् मेकॉलेला उलट पावली माघारी जावे लागले.



काही दिवसांनंतर ॲडजुटंट एग्न्यू किल्ल्याचा तट फोडण्यात यशस्वी झाला

ठण्ण !

खटाक

दोन्ही बाजूंचे अनेक सैनिक ठार झाले, पण किल्ल्यातल्या नेत्यांनी पलायन केले.

...आणि ते मरुडु पांड्यन व इतर साथीदारांना जाऊन मिळाले.

गनिमी काव्याने लढून इंग्रजांना त्रास देत राहिले.

या अवधीत इंग्रज आपल्या फौजा मजबूत करत होते.

वा ! राजा तोंडमान, तुमचे स्वागत असो ! तुमच्या मदती बद्दल फार आभारी आहोत.

तंजावरचे राजे साहेबही सैन्य व अन्य सामान पाठवत आहेत, सर !

पाळयकार मोठ्या शौर्याने लढले, पण त्यांना अनेक ठिकाणी हार खावी लागली.

करा हल्ला!

मारा !

मरुडु पांड्यन, त्याचा भाऊ वेळ्ळ पांड्यन त्यांचे मुलगे व तरुण नातू या सर्वांना कैद करून फाशी देण्यात आले. त्याचप्रमाणे गोपाल नायक व अन्य कडबोर पाळयकारांनाही ! १६ नोव्हेंबर १८०१ रोजी पांचालकुरुचीमध्ये सेवतैया व ऊमैदुरै यांची मस्तके धडावेगळी करण्यात आली.

अशीप्रकारे वर्षांची जुनी पाळयकार पद्धती समाप्त करण्यात आली. पांचाल कुरुची इंग्रजांना आपल्या कीर्तीला कलंक वाटत असल्याने सरकारी दप्तरातून ते नावच मिटवले गेले.








उत्तर आपला पिता विराट याला म्हणाला की, कोणा देवाने मदत केल्यामुळेच आपण कौरवांच्या हातून गायी सोडवून आणू शकलो. विराट यावर म्हणाला, ''कोण जाणे, कोणत्या परमेश्वराच्या महान् अुपकारानं असं घडू शकलं ! त्यांचं दर्शन घ्यायची इच्छा आहे माझी. त्यांची पूजा करून स्वतःला धन्य धन्य करावंसं वाटतंय. त्या परमेश्वरा जवळ माझी प्रार्थना आहे की त्यानं माझी इच्छा पुरी करावी.''

अुत्तरने सांगितले की, ''देवकुमार कुठे अदृश्य झालेत. अुद्या किंवा परवा येअून ते आपल्याला दर्शन देतील.'' नपुंसक रूपात देवकुमार तेथेच हजर असल्याचे विराट-राजाला कसे ठाअूक असणार !

यानन्तर तीन दिवसांनी पाचही पांडवांनी आपली प्रातःकालीन आन्हिके पूर्ण केली, स्नाने अुरकली श्वेत वस्त्रे परिधान करून विराटच्या दरबारात प्रवेश केला. राजे लोक बसत असलेल्या आसनांवर ते जाअून बसले.

थोड्या वेळाने विराटराजा सभास्थानी आला. अुच्चस्थानी बसलेल्या पांडवांना पाहून तो आश्चर्यचकित झाला. नंतर चिडून अुग्र स्वरात त्याने धर्मराजाला विचारले, ''मी तर तुला द्यूत खेळण्यासाठी नेमून घेतलं होतं. सिंहासनावर बसायचं धारिष्ट कसं केलंस ?''

अर्जुन विराटच्या या प्रश्नाचे अुत्तर देत म्हणाला, ''राजा, हे इन्द्राच्या अर्ध्या आसनावरही बसायच्या योग्यतेचे आहेत. हे तर काय, अेक सामान्य सिंहासन आहे ! हे स्वतः धर्मस्वरूप, अद्भुत बलशाली आणि राजर्षी आहेत. मनूप्रमाणेच या लोकाचे रक्षण करण्याच्या योग्यतेचे आहेत. कुरुदेशचे शासक असताना यांच्याजवळ दहा हजार गज अन् तीस हजार रथ होते. यांचं बळ



पाहून स्वतः दुर्योधन चिन्तित होत असे. अशा योग्य व्यक्तीची सिंहासनावर बसायची लायकी नाही, हे आपलं म्हणणं अुचित आहे का ?

अर्जुनच्या या बोलण्याचे विराटराजाला आश्चर्य वाटले. त्याने विचारले, ''काय हे कुंतीदेवीचे प्रथमपुत्र युधिष्ठिर आहेत ? मग यांचे बन्धु भीम, अर्जुन, नकुल, सहदेव कुठे आहेत ? द्रौपदी कुठे आहे । त्यांच्याबाबत काहीच वार्ता नाहीय. ते अस्तित्वात असतील, तर आहेत कुठे ?''

अर्जुन स्पष्ट करत म्हणाला, ''बल्लव म्हणून आपणाकडे काम करणारे, तेच भीम आहेत. त्यांनीच गंधर्वांवर विजय मिळवला अन् द्रौपदीसाठी सुगंधी फुलं घेऊन आले. कीचकवध करणारे गंधर्वही तेच. नाहीतर हे कठीण काम कोण करू शकलं असतं ? आपल्या घोड्यांची देखरेख करणारा अन्य कोणी नसून नकुलच आहे. गोधनाचं पालन करणारा गोपालक सहदेव आहे. दोघंही महाशूर आहेत. आपली दासी सैरन्ध्री हीच द्रौपदी आहे, आणि मी आहे अर्जुन. आपल्या छत्रछायेत आमचा अज्ञातवास सुखानं पार पडला.''

पांडवांचे रहस्य अुघड झाल्यावर अन् ते निजरूपात प्रकट झाल्यावर अुत्तरने अर्जुनाच्या पराक्रमाचे वर्णन केले. त्याने कौरवांना युद्धक्षेत्रातून कसे पळवून लावले अन् विजय मिळवला हे सांगितले. अर्जुनाची मुक्तकंठाने प्रशंसा करत तो म्हणाला, ''सिंह ज्याप्रमाणे हरणांचा पाठलाग करून त्यांना ठार करतो, त्याचप्रमाणे अर्जुनाने कौरव वीरांचा पाठलाग करून त्यांना पळवून लावले. मी स्वतःच्या डोळ्यांनी पाहिले की या वीराने आपल्या एकाच बाणाने मस्त हत्ती ठार केला ! यांनी शंख फुंकला, तेंव्हा शत्रूबरोबरच माझ्याही कानात दडे बसले !''

हे ऐकून विराट दबल्या आवाजात पुत्राला म्हणाला, ''तू खरंच बोललास. आपल्याला पांडवांशी मित्रता निभावली पाहिजे. तेंव्हा आता आपण आपल्या अुत्तराचा विवाह अर्जुनाशी करून देअू.''

उत्तर यावर म्हणाला, ''हे काम करण्यापूर्वी आपल्याला मोठ्या वैभवपूर्वक पांडवांचा सन्मान करायला हवा.''

विराट बोलला, ''होय, तू बोललास ते बरोबरच आहे. मी युद्धात पराजित होअून सुशर्माकडून पकडला गेलो, तेंव्हा भीमानं मला सोडवलं अन् आपल्याला विजय मिळाला. आपण धर्मराजला आपला बंधू बनवू. अज्ञानामुळे मी काहीच्या काहीच बोललो. त्यांच्याकडे क्षमा मागायला हवी मला !''

इतके बोलून विराट आपले राज्य, कोषागार व राजधानीसह सर्व काही अर्पण करून पांडवांना वारंवार मिठी मारून आपले प्रेम दर्शवू लागला.

नंतर तो धर्मराजाला म्हणाला, ''आपण वनवास पार करून अतिकष्टदायक अज्ञातवासही सफलतापूर्वक पूर्ण केलात. माझं राज्य अर्जुनच्या ताब्यात रहावं. आपली कन्या अुत्तरा हिचा विवाह मी त्याच्याशी करून देईन.''

धर्मराजाने अर्जुनाकडे पाहिले. अर्जुन विराटला म्हणाला, ''राजा, मी आपल्या कन्येला आपली सून करून घेईन. आपल्या दोन्ही वंशांमधे स्थिर संबंध प्रस्थापित व्हावेत हे आपल्या दोघांना चांगलं आहे, यात दोन्ही वंशांचं कल्याण आहे.''

हे ऐकताच अत्यन्त आश्चर्याने विराटने विचारले, ''माझ्या मुलीला पत्नी म्हणून स्वीकारण्यात आपणाला अडचण कसली ?''

''राजा, मी आपल्या मुलीला बऱ्याच काळापासून पहात आलो आहे. ती मला पित्याप्रमाणे मानते. शिवाय मी तिचा नृत्यशिक्षक आहे. माझा पुत्र अभिमन्यु श्रीकृष्णाचा भाचा आहे. तो अजून किशोरवयीन असला तरी साहसी आहे, वीर आहे, अस्त्र विद्येत अतिप्रवीण आहे. आपल्या पुत्रीला सुयोग्य असा वर आहे तो.'' अर्जुनाने सांगितले.

विराट अर्जुनाच्या बोलण्याने संतुष्ट झाला व म्हणाला, ''ठीक आहे. आपल्या इच्छेनुसारच करीन. माझ्याशी जोडलं जाणारं





नातं शुभदायक अन् फलप्रद होवो.''

कोणत्या मुहूर्तावर विवाह व्हावा, हे धर्मराजाने निश्चित केले. विराट व अर्जुनाने यासंबंधी बातमी श्रीकृष्णाकडे पोचवली.

अज्ञातवास पूर्ण होताच पांडवांनी विराटनगर सोडले अन् ते मत्स्य देशच्या अुपप्लाव्य नामक स्थानी जाअून राहू लागले. पांडवांचे हितचिंतक आपापल्या सेनेसह तेथे आले. द्रुपद व द्रौपदीचे पुत्र अुपपांडव, शिखंडी, धृष्टद्युम्न हे सर्वजण आपल्या एक अक्षौहिणी सेनेसह तेथे आले. विराटने द्रुपदराजाचे स्वागत केले, त्याची पूजा केली व आदराने त्याला आपल्याकडे घेअून गेला. अशा प्रकारे राजे अुपप्लाव्यला पोचले.

द्वारकेहून अभिमन्यु, इन्द्रसेन आदि सर्वांना घेअून श्रीकृष्ण व बलराम आले. त्यांच्याच बरोबर कृतवर्मा, युयुधान, सात्यकी, अक्रुर, सांब हेही आपापल्या रथातून आले.

विराटाच्या घरी शंख फुंकले गेले, भेऱ्या वाजवण्यात आल्या. आगतांचे अुत्तम प्रकारे स्वागत झाले. विराटने पांडवांची पूजा केली. अुसाचा मधुर रस त्यांना पाजला. सुदेष्णा व अन्य राजस्त्रियांनी अुत्तरेला वधुवेषात सजवले, तिला अलंकार चढवले.

अर्जुनाने व धर्मराजाने अुत्तरेला सहर्ष-मनाने आपली सून बनवून घेण्याचे जाहीर केल्यावर श्रीकृष्णाच्या अुपस्थितीत हा विवाह घडून आला. अभिमन्यु व अुत्तरा विवाहबंधनात बांधले गेले.

विवाहाच्या दुसऱ्याच दिवशी अभिमन्यु व पांडवांचे अतिथी विराटच्या सभागृहात अुपस्थित झाले. त्यात विराट, द्रुपद व अन्य वृद्ध राजेही अुपस्थित होते. सभेत वसुदेव, सात्यकी, बलराम, कृष्ण, प्रद्युम्न सांब, अुपपांडव व विराट पुत्रही होते.

थोडा वेळ ते सर्व आपसात बोलत राहिल्यानन्तर सर्वांना संबोधून श्रीकृष्ण बोलू लागला-

''आपणा सर्वांना माहीतच आहे की शकुनी द्वारा कपटाने खेळलेल्या द्यूतात आपला धर्मराज हरला. त्याचे राज्य हडपण्यासाठीच दुर्योधनाने ही कपटनीती वापरली होती. स्वतःच्या बल-पराक्रमाच्या जोरावर पांडव राज्य परत मिळवू शकत होते, पण वचनबद्ध होअून त्यांनी कठोर वनवास भोगला अन् नन्तर त्याहूनही कठीण असा अज्ञातवासही पूर्ण केला. एक संपूर्ण वर्षभर ते दास म्हणून राहिले. आता आपण पुढे काय करावे याचा निर्णय आपणच घ्यायचा आहे. हा निर्णय धर्मराज व दुर्योधन या दोघांनाही योग्य व न्यायोचित वाटला पाहिजे. तो धर्मसम्मतही असावा. धर्मराज इन्द्रपद मिळत असेल, तरी अधर्म स्वीकारणार नाही. धर्मानुसार त्याला एकादं छोटंसं गाव दिलं, तरी ते तो सहर्ष स्वीकार करील. तो नेहमीच धृतराष्ट्रपुत्रांचं कल्याण इच्छिणाऱ्यांपैकी आहे. आता पांडव स्वबळानं मिळवलेलं राज्य परत मागणार आहेत. दोन्ही पक्षांचं लोक भावाभावांचे पुत्रच तर आहेत. तेंव्हा असा मार्ग शोधा की, ज्यात अुभय पक्षांचे कल्याण होईल. दुर्योधनाने न्यायपूर्वक पांडवांचं राज्य त्यांना परत दिलं, तर काहीच अडचण येणार नाही. पण तसं न घडलं, तो यांच्यावर अन्यायच करायला अुठला, तर पांडव धृतराष्ट्रपुत्रांना मारून टाकायला कदापी संकोचणार नाहीत. त्यांचा पार विध्वंस करतील. आपण असं मुळीच समजू नका की, दुर्योधन बलवान अन् पांडव बलहीन आहेत. दुर्योधनाचे विचार आपल्याला अजून कळलेले नाहीत; म्हणून ते जाणण्यासाठी इथून एकादा दूत पाठवायला हवा. हा दूत अत्यन्त कुलीन, जागरूक आणि कुशल असायला हवा. या दूताचे काम म्हणजे-दुर्योधनाला भेटून पांडवांना त्यांचं अर्ध राज्य परत द्यायला समजावायचे. तो या कार्यात सफल व्हावा अशीच माझी आशा आहे.''

यानन्तर श्रीकृष्णाच्या प्रस्तावाचे समर्थन करत बलराम म्हणाला, ''इथून जाणारा दूत भीष्म, धृतराष्ट्र, द्रोण, अश्वत्थामा, कृप, कर्ण आदि कौरव प्रमुखांना भेटेल अन्





त्यांच्याशी चांगल्या प्रकारे बोलेल, त्यांना अुत्तम प्रकारे सर्व समजावून सांगेल. कोणताही पक्ष तो स्वतः स्वीकारणार नाही, स्वतःचा स्वार्थ पहाणार नाही. शकुनी अन् धर्मराज यांनी द्यूत खेळायची चूक केली हे मान्य आहे मला. शकुनी फासे फेकण्यात कुशल आहे. धर्मराज दुसऱ्या कोणाशी खेळला असता, तर नक्की जिंकला असता. आवेशात येअून त्यानं सर्वकाही पणाला लावलं. शकुनीनं फसवलं असं मी मुळीच मानत नाही. तेंव्हा इथून जो दूत जाईल, त्याला दुर्योधनाचं प्रेम जिंकणं आवश्यक आहे.''

बलरामचे हे बोलणे ऐकून सात्यकी अत्यन्त चिडला. अुभा राहून बलरामाची निन्दा करत तो म्हणाला, ''तू आपल्या मनचं बोललास, याबद्दल माझा राग नाही तुझ्यावर ! तुझी अर्थहीन बडबड ऐकूनही कोणीच काही बोलत नाही, हे पाहून मी तुझ्यावरच नव्हे, तर या सगळ्यांवर नाराज आहे. धर्मराजाला जबरदस्तीनं खेळायला भाग पाडलं गेलं, तेंव्हा हा जय न्यायपूर्ण कसा ठरतो ? ते स्वतः धर्मराजाच्या घरी येअून द्यूत खेळून जिंकले असते, तरच हे न्याय्य झालं असतं ! ते काहीही असो, पांडवांनी वचनबद्ध होअून वनवास भोगला, अज्ञातवासही पूर्ण केला. आपला धर्म पाळून त्यांनी शाबित केलंय की ते चारित्र्यवान, नीतिवान अन् सत्यशील आहेत. अशा परिस्थितीत आता धर्मराजानं आपलं राज्य परत मागितलं, तर त्यात अधर्म कसला ? दुर्योधनाचं मन कलुषित आहे, त्याचे विचार वाईट आहेत, हे मी चांगलं ओळखून आहे. आपल्याच असणाऱ्या राज्याची पांडवांनी भीक का मागावी ? दुर्योधन कोणत्याही परिस्थितीत यांचा प्रस्ताव मान्य करणार नाही. पांडवांचं राज्य त्यांना परत देणार नाही, धर्ममार्गावर चालायला तो तयार होणार नाही. इतकंच नव्हे, तर त्याचे अनुयायीही अनीतिच्या मार्गावर चालायला त्याला प्रोत्साहन देतील. दुर्योधन धर्ममार्गावर चालेल, असं कोणी म्हणत असेल. तर ते सर्वस्वी खोटं अन् भ्रम ठरेल, आपण सर्वांनी त्याचा नाश करून युधिष्ठिराला राज्याभिषेक करू. धृतराष्ट्र धर्मराजवर दया म्हणून त्याला त्याचं राज्य परत देअू पाहील, तरी असलं भिकेचं राज्य आम्हाला नकोय ! धर्मराजचं मत जाणल्यावाचून कोणी पुढे काहीच करू नये.''

द्रुपद म्हणाला, ''सात्यकी बोलला ते सारं बरोबरच आहे. खरी गोष्ट अशी की, सत्य गोष्टींमुळे विरघळून, आपलं मन बदलून दुर्योधन राज्य परत करणार नाही. धृतराष्ट्राचे पुत्र त्याच्या कह्यात नाहीत. ते त्याच्या बोलण्याची मुळीच पर्वा करणार नाहीत. भीष्म अन् द्रोण अशा विचित्र परिस्थितीत आहेत, की त्यांना दुर्योधनाचं समर्थन करणं भाग आहे. कर्ण अन् शकुनी त्याची सेवा करण्यात धन्यता मानतात. ते मूर्खच आहेत. आपण जो दूत पाठवू तो चांगला असणं इतकंच पुरेसं नाहीय. केवळ गोडगोड बोलण्यानं काम साधता येणार नाही, काही अुपयोग नाही त्याचा. मला स्पष्टपणे वाटतं की दूताच्या असल्या बोलण्यानं, दुर्योधनाला पांडव कमजोर अन् पंगु वाटतील. आपल्याला आपणाकडून होतील तितके प्रयत्न करायला हवेत. शल्य, धृष्टकेतु, जयत्सेन, कैकेय आदि सर्वांना आपापल्या सैन्यासह येण्याबद्दल आपण निरोप पोचवायला हवेत. आपल्या इतर सहयोगी राजांनाही ससैन्य येण्याबद्दल आमंत्रणं पाठवावीत. दुर्योधनही असंच करील. जो प्रथम मदत मागेल, त्याला ती दिली जाईल. तेंव्हा प्रथम सैन्य एकत्र करायच्या कामाला लागायला हवं. माझा हा पुरोहित वृद्ध, अनुभवी, धर्मशील अन नीतिवान आहे. तुम्हाला काय म्हणायचंय ते सांगून त्याला धृतराष्ट्रच्या दरबारात पाठवा.''

शेवटी श्रीकृष्ण म्हणाला, ''द्रुपदाच्या म्हणण्याप्रमाणे केलं, तर पांडवांचं भलं होईल, दोन्ही पक्षांच्या लोकांनी सुखानं रहावं, मैत्रीनं रहावं, यापरतं आपल्याला काय हवं? आपण सर्वांनी आपापल्या स्थानी परत जावं हे चांगलं ! द्रुपद वृद्ध आहेत. आपल्याला गुरु सारखे आहेत. धृतराष्ट्रला काय निरोप पाठवावा, हे त्यांनी ठरवलं तर अुत्तम होईल, भीष्म, द्रोण आदि त्या संदेशाचं नक्की स्वागत करतील. दुर्योधनाने निरोप अस्वीकृत केला, तर इतर राजांना जो निरोप पाठवला जाईल, तो मलाही कळवावा.''

इतके सांगून श्रीकृष्ण परत जायला निघाला तेंव्हा त्याला अनमोल भेटवस्तु देअून विराटने आदराने निरोप दिला. -क्रमशः



# 'चांदोबा' च्या बातम्या

### विलक्षण छन्द

सामान्यतः असे आढळते की, मुले विदेशी स्टॅम्प्स, तऱ्हे-तऱ्हेची नाणी, चित्रविचित्र पोस्टकार्ड-चित्रे, चॉकलेटचे रंगीबेरंगी कागद छन्द म्हणून गोळा



करतात. पण केरळ राज्यातल्या निलंबूरचे शमीर व शाहीर नामक दोन भावांचा छन्द विलक्षणच म्हणायला हवा. निलंबूरच्या दाट जंगलात खूप हत्ती असतात. दोघे भाऊ एकदा जंगलाच्या आसपास फिरत असताना त्यांना एका पक्ष्याचे जवळ जवळ दोन फूट लाम्बीचे एक पीस सापडले. त्यांनी ते घरी आणून सुरक्षित ठेवले. तेंव्हापासून ते पक्षांची तऱ्हतऱ्हेची पिसे गोळा करू लागले. तो त्यांचा छन्दच बनला. मोर, पोपट मैना यांसारख्या जवळ जवळ दोनशे प्रकारच्या पक्षांच्या पिसांचा संग्रह त्यांनी बनवला. आई-बाप व शिक्षकांनी यासाठी त्यांना खूप प्रोत्साहन दिले. त्यांनी या भावांना पक्ष्यांबद्दल नवनवीन माहिती पुरवली. निरनिराळ्या पक्ष्यांची आहारपद्धत व त्यांच्या जीवन शैली बद्दल दोघांनी नोट्सही लिहून ठेवल्या. पिसांच्या संख्येपेक्षा आता 'त्यांची विविधता' हा त्यांचा प्रधान विषय बनला. त्यामुळे आता ते फक्त खास विचित्र पक्ष्यांची पिसेच जमवण्यात रुचि दाखवू लागलेत अन् त्या प्रयत्नाला लागलेत.

### सोन्याचा छन्द

४,१३,००० करोड रुपयांचे ९,४०० टन सोने आज आपल्या देशात आहे. इतके सारे सोने दागिन्यांच्या रूपात येथील संपन्न कुटुंबात आहे. जगात अुपलब्ध असणाऱ्या सोन्यापैकी आठ टक्के सोने आपल्या देशात आहे. असा अन्दाज आहे की दरवर्षी पाचशे टन सोने आपल्या देशातले लोक खरेदी करत असतात यापैकी फक्त दोन टन सोनेच आपल्या देशातल्या खाणींमधे मिळते. बाकीचे सगळे विदेशातून आयात होते.

### हाडांच्या सापळ्याचा लिलाव

अमेरिकेच्या द. डकोटात १९९० मधे हिड्रिक्सन नामक एका शास्त्रज्ञाने जवळ जवळ ६५,०००,००० वर्षापूर्वीचा एका डायनोसोरचा हांडांचा सापळा शोधून काढला. पन्नास फूट लांबीच्या या सापळ्याचे नाव आहे 'सुई'. आत्तापर्यन्त डायनोसोरचे जितके सापळे सापडले, त्यांच्यात चाळीस ते पन्नास टक्के हाडे खिळखिळी, मोडकी अशी होती. परन्तु 'सुई' ची सारी हाडे अगदी सुरक्षित आहेत. त्यात एकही हाड खिळखिळे झालेले नाहीय. नुकताच या सापळ्याचा न्यूयॉर्कमधे लिलाव झाला. चिकागो म्युझिअमच्या एका मालकाने ८,४००,००० डॉलर (जवळपास तीस करोड रुपये) देऊन तो खरेदी केला.

# चांदोबा पुरवणी ११०



## आपल्या देशाची सौन्दर्यस्थळे

# कोचीन





हिरव्यागार भूमीने आणि पर्वतांनी भरलेल्या दक्षिण भारतातील केरळ राज्यातल्या कोचिन नगराला स्वतःचा प्राचीन इतिहास आहे. ऐतिहासिक व सांस्कृतिक विविधतेसाठी हे शहर प्रख्यात आहे. शेकडो वर्षांपासून येथील बन्दरातून चहा, कॉफी, सुगन्धी द्रव्ये इ. निर्यात केले जाते. सोळाव्या शतकात पोर्तुगीजांनी हे आपल्या ताब्यात घेतले होते. यानन्तर ते डचांच्या हाती गेले. बंदराजवळच्या मट्टानचेरी जवळ 'डच पॅलेस' आहे. परंतु खरे पाहता तो पोर्तुगीजांनीच १५५७ मधे बांधला होता. डचांनी याचा १६६३ मधे जीर्णोद्धार केल्यामुळे त्याला हे नाव प्राप्त झाले.

कॉमनवेल्थ देशांमधील अतिप्राचीन असे यहुदी लोकांचे प्रार्थना मन्दिर 'सिनॅगॉग' इथेच आहे. याचे बांधकाम १५६८ मधे केले गेले. परन्तु इसवीसनाच्या पहिल्याच शतकात रोमन लोकांच्या अत्याचारांनी पिडलेले यहुदी आश्रयार्थी म्हणून केरळमधे आले होते. चिनी लोक मासे पकडण्यासाठी ज्या नावांचा अुपयोग करतात, त्या केवळ कोचिनमधेच आजही वापरात असलेल्या दिसतात.

कोचीनला घेरून बरीचशी बेटे आहेत. तिथे पोचण्यासाठी नावा अुपलब्ध आहेत. वेलिंगटन बेटाजवळ डॉल्फिन्स अुसळ्या मारत असलेले दिसतात. आल्हादकारक वातावरणात वैपीन बेटावर इकडे तिकडे फिरताना मनाला खूप शांती मिळते. कोचिनमधे रेल्वे स्टेशन व हवाई-अड्डाही आहे. या नगरात पोचण्यासाठी अलेप्पीपासून नावेत बसून गेलात तर दोन्ही बाजूंनी नारळांच्या झाडांचा दाट जंगलातून वहाणाऱ्या प्रवाहातून जायला मिळते. हा प्रवास आपल्या तनमनाला प्रफुल्लित करतो.

पुराणकाळातील राजे

# एकवीरा

खूप पूर्वी गंगेच्या किनाऱ्यावर लहान-लहान राज्ये असत. त्यांपैकी एका राज्याचा युवराज होता एकवीरा. तो हैहय वंशाचा होता. एक दिवस वनविहार करत असता दक्षिणेकडून अद्‌भुत असा सुगंधित वास आला. वास कोठून येत आहे, हे शोधण्यासाठी तो निघाला. एका सरोवराच्या मध्यभागी एक शतदल कमळ अुमलेले त्याला दिसले. सरोवराकाठी एक सुन्दर युवती विलाप करत असलेलीही त्याला दिसली. तिच्या जवळ जाअून युवराजाने रडण्याचे कारण विचारले.

शेजारच्या राजा रैभ्यची कन्या एकावलीची ती सखी होती. राजकुमारीला कमळांची फार आवड असल्याने राजाने तिच्यासाठी खूपसे 'कमलताल' बनवले. या सरोवराच्या दिव्य कमलपुष्पाच्या सुगंधाने प्रभावित होअून ती आपल्या सखीसह इथे आली होती. कालकेतु नावाच्या राक्षसाने तिच्या सौन्दर्यावर मोहित होअून तिच्याशी विवाह करायची इच्छा प्रकट केली. तिने नकार देताच तिला अुचलून त्याने पाताळलोकातल्या गुहेत बन्द करून ठेवले. त्यामुळेच ही सखी विलाप करत होती.

एकवीरा ताबडतोब पाताळलोकात गेला व राक्षसाला ठार करून तो युवराणी एकावलीला सोडवून घेअून आला. नंतर त्याने तिला राजा रैभ्यच्या स्वाधीन केली.

एकवीराच्या साहसावर खूश होअून रैभ्यराजा प्रसन्न होअून त्याला म्हणाला, ''युवराज, मी यापूर्वीच आपल्या कन्येचा विवाह तुझ्याशी करून द्यायचं ठरवलं होतं. त्यासाठी मी आपल्या मन्त्र्यांना तुमच्याकडे पाठवणारच होतो. आता तर तू स्वतःच तिचं रक्षण करून माझ्याकडे तिला घेअून आलायस. तेव्हा आता विवाहाला मान्यता दे.

एकवीराने आनन्दाने तिच्याशी विवाह केला.





## तुम्हाला माहीत आहे काय?

### प्रभुत्वाची चिन्हे




मध्ययुगात राजपरिवाराचे योद्धे आपल्या ढालींवर सुन्दर चिन्हें कोरून घेत असत. त्यांना 'हेरॉल्डिक डिझाइन्स' म्हणतात. या बाबत अध्ययन करणाऱ्या विभागाला 'हेरॉल्ड्री' असे म्हणतात. केवळ अलंकार म्हणून याचा अुपयोग. ११४० च्या सुमारापासून या चिन्हांचा अुपयोग होवू लागला. वंशपरंपरेने एका पिढीनंतर दुसरी पिढी ही चिन्हे धारण करी. काही योद्धे केवळ ढालींवरच नव्हे, तर शिरस्त्राणं, चिलखतं आणि घोड्याच्या लगामांवरही ही चिन्हें कोरून घेत. त्याकाळी योध्यांचे खास असे पोशाख नसत, त्यामुळे प्रभुत्व दर्शवणारी ही चिन्हे वापरली जात. कोण मित्र व कोण शत्रु हे ओळखणे यामुळे सोपे जाई.

## इन्द्रधनुष

### कार्ल लुईस




खेळाडू परिवारातला एक अद्‌भुत खेळाडू आहे-कार्ल लुईस. त्याचा पिता व्यायामशिक्षक होता. आई व बहीण अंतर्राष्ट्रीय खेळाडूआहेत. त्याचा भाअू 'सोकर' खेळतो. क्रीडा क्षेत्रात कार्लचे जीवन खूपच सफल म्हणायला हवे. १९८३च्या युनायटेड स्टेट्स चॅंपियनशिपमधे हा तीनदा विजयी झाला. १९८४त ऑलिंपिक्स मधे भाग घेअून याने जेस्सी ओवेन्सच्या बरोबरीचे अुच्चांक मिळवले. १९८८ च्या सिओल ऑलिम्पिक्समधे १०० मी, २०० मी. धावण्याच्या स्पर्धेत, लॉंग जंपमधे व ४ x १०० मी. रीले मधे अशी चार सुवर्णपदके मिळवून जेस्सी ओवेन्सशी बरोबरी केली. लॉंग जंपमधे त्याने जास्त पदके मिळवली नाहीत पण थोड्या अंतरात खूप वेगाने स्टार्ट घेअून अुडी मारण्यात तो 'स्प्रिंटर' म्हणून प्रसिद्ध झाला. क्रीडाक्षेत्रातून तो नुकताच निवृत्त झाला आहे.

